# पुष्पहार.

ले० सौ० गिरिजाबाई केळकर.





किंमत ८८ आणे.

# पुष्पहार.



लेखकः— सौ. गिरिजाबाई केळकर.

( " गृहिणीभूषण " " स्त्रियांचा स्वर्ग " " पुरुषांचें बंड "
" आयेषा " इत्यादिकांची कर्त्री )



आवृति पहिली.







जळगांव येथें बाबजी प्रिंटिंग प्रेसांत छापिलें

सन १९२१

किंमत ८ आणे.

# उपोद्घात.



" **गृहिणी भूषण** " पुस्तकांची आजपर्यंत तीन भाषेंत भाषांतरें झालेलीं व त्याच्या एकंदर चार आवृत्त्या निघाल्या. तें पाहून तशाच प्रकारचे आणखी कांहीं लेख प्रसिद्ध केल्यास ते ही वाचक बंधुभगिनींनां आवडतील असें वाटलें. आणि ह्मणून हें " **पुष्पहार** " पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. गृहिणीभूषण प्रसिद्ध केल्यानंतर मी जे पुढें कांहीं स्फुट लेख लिहिले व कांहीं ठिकाणीं व्याख्यानें दिलीं त्यांतील कांहीं लेख व कांहीं व्याख्यानें पुस्तकरूपानें झाल्यास जास्त चिरस्थायी होतील असें वाटल्यावरून त्यांतील कांहीं लेख व कांहीं व्याख्यानें व कांहीं नवे लेख असे एकत्र करून हा एक त्या पुष्पांचा लहानसा हार गुंफला आहे. मनुष्य स्वभावाच्या रुचिवैचित्र्याप्रमाणें यांतील सर्वच पुष्पें कांहीं सगळ्यांनाच आवडणार नाहींत. तरी पण निरनिराळ्या आवडीच्या माणसांना त्यांतलें एखादें पुष्प तरी आवडेल अशा भावनेनें हा हार सहृदय वाचकांच्या पुढें ठेवीत आहे. त्याचाही ते " **गृहिणी भूषणा** " प्रमाणेंच स्वीकार करतील अशी आशा आहे.

हा माझा लहानसा हार मी श्री. रा. रा. कृष्णाजी शंकर दीक्षित डे० एज्युकेशनल इन्स्पेक्टर सातारा यांना दाखविला तो त्यांनां पसंत पडून प्रस्तावनेच्या रूपानें चार शद्ब त्यांनीं लिहून दिले याबद्दल मी त्यांची अत्यंतिक आभारी आहे.

आमचें जळगांव, गांव आधींच लहान. अर्थात् त्यांत मोठासा छापखाना नाहीं. असें असून बाबजी प्रिंटिंग प्रेसच्या मालकांनीं हें पुस्तक छापावयाचें काम हौसेनें हातांत घेऊन पुरें करून दिलें याबद्दल त्यांचेही आभार मानणें जरूर आहे.

शेवटीं, ज्या जगन्नियंत्यानें हा " पुष्पहार " गुंफण्याची संधि आणून दिली त्याचें मनोभावानें स्मरण करून पुरे करते.

मनोहर भुवन; जळगांव
गुरुवार ता. २०-१०-१९२१

सौ. गिरिजाबाई केळकर.



# अर्पण-पत्रिका.



माझ्या परमपूज्य सासूबाई

**सौ. गं. यशोदाबाई केळकर**

यांस

अत्यंत नम्रतापूर्वक अर्पण केलें असें.

ग्रंथकर्त्री.

# प्रस्तावना.

“ गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ ”
रघुवंश, कालिदास.

पाश्चात्य शिक्षणाच्या संस्कारानें ज्या गोष्टीचा आपणांस विशेष लाभ झाला त्यांपैकीं स्त्रियांना शिक्षण देण्याची इच्छा हा होय. अलीकडे स्त्रीशिक्षणाच्या फैलावास शक्य तितकी मदत दिली जात आहे व मुलांबरोबर मुलींच्या शाळा जिकडे तिकडे झाल्या आहेत. पण मुलींच्या अभ्यासाचा कार्यक्रम काय असावा, ह्मणजे त्या समाजाच्या नेत्या होतील, व त्यांच्यावर समाजाची काय जबाबदारी आहे ती त्यांचे ध्यानांत येईल, याविषयीं मात्र विचार अत्यंत शैथिल्यानें चालू आहे. स्त्रीसमाजांतीलच कांहीं व्यक्ति जोरानें व जोमानें पुढें येऊन जर समाजांत याबद्दल खळबळ उडवून देतील, तर मात्र ही गोष्ट लवकर साध्य होणार आहे. समाधानाची गोष्ट ही आहे कीं, हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतून कांहीं स्त्रिया व कांहीं स्त्री–संस्था पुढें येत आहेत, व स्त्रीशिक्षणासंबंधीं खरी जागृति समाजांत उत्पन्न व्हावी यासाठीं खटपट करीत आहेत. अशा स्त्रियांपैकीं मुंबई इलाख्यांत ज्यांचीं नांवें प्रामुख्यानें सांगतां येतील त्यांपैकीं श्री. सौ. गिरिजाबाई केळकर ह्या एक होत.

श्री. सौ. गिरिजाबाई केळकर यांणीं स्त्रियांच्या उन्नतीसाठीं समाजाचें कर्तव्य काय या विषयीं जे अनेक ग्रंथ लिहिले आहेत, त्यांवरून त्यांची मराठी वाङ्मयाबद्दल लालसा व मराठी वाङ्मयाची सेवा, तसेंच विचारांची प्रौढ व उत्साहजनक सरणी हीं दृश्य होत आहेत. त्यांचे ग्रंथ मराठी वाचकांस चांगले आवडते झाले आहेत, व स्त्री–समाजास तर ते फार उपयुक्त झाले आहेत. सारांश त्यांणीं व्यक्तिशः चालविलेली ही समाजसेवा व वाङ्मयसेवा हीं स्पृहणीय आहेत व तीं आमच्या समाज–नायकांसही मान्य झालेलीं आहेत. ह्मणून श्री. सौ. गिरिजाबाई केळकर यांचा मराठी–वाङ्मय–प्रांगणावर नव्यानेंच प्रवेश झाला नसल्यामुळें, त्यांची ओळख वाचकांस नव्यानें करून द्यावयाची आहे असें मुळींच नाहीं.

आतां समाज–सुधारणेविषयीं जीं मतें व ज्या कल्पना आहेत तीं मतें व त्या कल्पना मात्र आमच्या समाजांत इतक्या विविध आहेत कीं, त्या सर्वांचें एकीकरण करणें कठीण आहे. पण प्रत्येकास आपलेंच मत खरें व मी ह्मणतो तसेंच समाजानें चालावें असें वाटावें व अशाच रीतीचा ओघ त्याच्या विचार-सरणींत, त्याचे ग्रंथांत, त्याचे भाषणांत दिसून यावयाचा. ह्मणजे जितके निरनिराळे पंथ तितक्या निरनिराळ्या विचार–शाळाच दिसून येतात. त्याप्रमाणेंच श्री. सौ. गिरिजाबाई यांस ही समाजानें विशिष्ट तऱ्हेनेंच व विशिष्ट मार्गानेंच जावें असें वाटत आहे, हें

त्यांच्या ग्रंथावरून, व व्याख्यानावरून स्पष्ट होत आहे. स्वमत प्रस्थापनाची जी ही निरनिराळ्या व्यक्तींची अहमहमिका त्यायोगें समाजाचें मात्र हितच होत आहे यांत शंका नाहीं.

कै. न्यायमूर्ति रानडे यांचें एका सामाजिक परिषदेंत व्याख्यान झालें, त्यांत विषय होता कीं,:—

'We cling to the past and we are drawn by the present, but both have equal rights on us.'

ह्मणजे आह्मीं जुन्या गोष्टींस चिकटून राहतों पण वर्तमानकाळ हा आपणांस पुराण-गोष्टींपासून दूर नेत असतो, पण भूतकाळ व वर्तमानकाळ हे दोघेही आह्मांवर सारखे हक्क बजावतात. ह्मणजे दोघांसही आपण मान दिला पाहिजे असें झालें.

श्री. सौ. गिरिजाबाई यांच्या प्रस्तुत लेखमालेंतील सर्व विषयांत त्यांचें एक समाज-सुधारणेचें विशिष्ट मत ओतप्रोत भरलेलें आहे हे सर्व लेख वाचल्यावर अगदीं स्पष्ट दिसतें. जसें ज्ञानाचा सर्व लय सरतेशेवटीं एकच असें आपण ह्मणतों तसेंच यांच्या लेखांचा सर्व लय एकाच विचारांत केंद्री-भूत झालेला आहे. स्त्रियांस अंध:कारांत न टाकतां त्यांस शिक्षणानें पुढें आणणें व त्यांस समाज-सेवेचा वाटा प्रामुख्यानें ध्यावयास लावावयाचा हें तर प्रस्तुत लेखकाचें मत आहेच, पण त्याबरोबरच जुन्याचा कंटाळा करूं नका, जुन्याचा हेवा वाटूं देऊं नका, जुनें सोडलें ह्मणजे

आह्मीं सुधारलों असें कित्यकांस वाटतें तें भ्रामक आहे, हें कंठरवानें सांगण्याचें व्रत श्री. सौ. गिरिजाबाई यांनीं आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथांतून पत्करलेलें जसें स्पष्ट आहे, तसेंच या लेखांतही तेंच दिसून येत आहे, असें वाचकांच्या नजरेस मुख्यतः आणिलें ह्मणजे प्रस्तुत लेख–माला वाचून मनन करण्याची लालसा वाचकांस उत्पन्न होईल व त्यायोगें ही प्रस्तावना लिहिणाराचा उद्देश सहजच सफल होणार आहे.

प्रस्तुत लेखांतील कांहीं लेख व्याख्यानरूपाचे आहेत, व ते निरनिराळया संस्थेपुढें व्याख्यानरूपानें अगोदरच समाजापुढें आलेले आहेत, व कांहीं वर्तमानपत्रांतून त्यांचा गौरव करण्यांत आलेला आहे. इतकें सांगितलें ह्मणजे लेखांची महति वाचकाच्या लक्षांत येईल अशी आशा आहे. माझें तर असें मत आहे कीं, स्त्रीशिक्षणाच्या गांवोगांव ज्या संस्था आहेत, त्या संस्थापुढें जी वेळोवेळी व्याख्यानें देण्यांत येतात, त्यां ऐवजी हें एक, एक व्याख्यान जर वाचून दाखविलें तर फार कार्य–सिद्धि होणार आहे. त्या विशिष्ट स्थळांतलि सर्व स्त्रियांस एकत्र हे विचार कळून त्यामध्यें स्त्रियांस शिक्षण देण्याची जरूरी, त्याचा प्रकार, आमचे सामाजिक विचार व आचार, त्यांत उन्नति कशी करावी, आमच्या विवाहपद्धतींतलि दोष व गुण यांसर्वांविषयी स्त्रीसमाजांत जागृति उत्पन्न करण्याचें प्रस्तुत लेख हें चांगलें साधन झालें आहे, असें माझें स्पष्ट मत आहे, व या समाज–सेवेबद्दल प्रस्तुत ग्रंथकर्तीचे आभार मानावे तितके थोडेच.

या लेख–मालेतील विचारांचा सारांश देत बसणेचें प्रयोजन नाही. ते लेख जसेचे तसेच वाचकांपुढें यावे अशी इच्छा आहे. पण एक गोष्ट येथें नमूद करण्याची आवश्यकता आहे. ती सांगून ही अल्प प्रस्तावना संपवितों.

माझा व श्री. सौ. गिजाबाई केळकर यांचा परिचय होऊन आज ७।८ वर्षें झाली तितक्या अवधीत त्यांचें वाचन त्यांचा वाङ्मय सेवेचा अन्तिम हेतु त्यांचे विचार–प्राचुर्य, व त्यांची भाषण–शैली यांविषयी माझें मत,

सलिल--निधिरिव प्रतिक्षणं मे,
भवति नवो नवोऽयमक्ष्णोः ।

या सुप्रसिद्ध कव्युक्ती प्रमाणें झालेलें आहे एवढ्यामुळेंच ही प्रस्तावना म्यां लिहावी अशी उत्कट इच्छा मला झाली, व ही संधि प्रस्तुत ग्रंथकर्त्रीने मला दिली त्याबद्दल मी तिचा फार आभारी आहे. प्रस्तुत लेख--संग्रह स्त्रीसमाजाचे आदरास खास पात्र होईल असा मला भरंवसा वाटत आहे.

सातारा
१७।१०।२१

कृष्णाजी शंकर दीक्षित (बी. ए.
डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर
सातारा.

———×———

# पुष्पहार.

## अनुक्रमणिका. पान

# हिंदु समाजांतील स्त्रीशिक्षणाचें पुढील ध्येय.



स्त्रीशिक्षणासंबंधानें हल्लीं जिकडे तिकडे जोराची चळवळ चालू आहे; व प्रागतिक ह्मणणाऱ्या लोकांचीं ध्येयें भराभर पुढें येत आहेत. अशावेळीं माझा हा लेख पाहून पुष्कळांना माझा राग येईल, हे मला माहीत असूनही मी हा लेख लिहीत आहे. कारण मी गृहिणीभूषणांतील माझे स्त्रीशिक्षणावरील लेख लिहिल्यानंतर इतके दिवस विचार करून पाहिलें तरी अद्यापि माझे विचार बदलत नाहींत. इतकेंच नव्हे तर हल्लीं सुरू असलेली पद्धत अशीच चालू राहिल्यास पुढें कसें होईल ह्याचें चित्र डोळ्यांपुढें येतें; आणि ह्मणूनच पुनः एकदां आपलें एका बाजूचें मत ह्मणून तें लोकांपुढें ठेवावेसें वाटतें. हें मत कदाचित् चुकीचें असेल आणि तें पुष्कळांना आवडणारही नाहीं हें मी समजून आहे.

हल्लीं स्त्रियांच्या शिक्षणासंबंधानें बहुतेक सुशिक्षित समाजांतील मतभेद नाहींसा झाला आहे; आणि स्त्रियांना शिक्षण पाहिजे असें बहुतेक एकमत झाल्यासारखेंच आहे. तरी पण तें कसें असावें ह्यासंबंधीचा फारसा विचार झालेला आढळत नाहीं. निदान तशा प्रकारचा निरनिराळ्या दिशेनें विचार केलेलीं माणसें तरी पुढें आलेलीं दिसत नाहींत. हल्लीं जीं माणसें पुढें आलीं आहेत व जीं ह्या बाबतींत खटपट करितात त्यांचे विचार ह्मणजे काय?

त्यांची दृष्टी पाश्चात्य पद्धतीच्या शिक्षणावर गेली असल्यामुळें त्यांची कृति सहाजिकच तशी होते आणि त्यामुळें ते मुलींकरितां म्हणून ज्या शाळा, कॉलेजें वगैरे काढीत आहेत, तीं सर्व मुलांच्या शाळांच्या व कॉलेजांच्याच धर्तीवर असतात. ह्यानें होतें काय की, त्यांची जरी इच्छा नसली तरी मुली स्वाभाविकपणेंच मुलगे बनतात. जसें ट्रेनिंग कॉलेजांतील विद्यार्थी विद्यार्थीनीला परीक्षा पास होणें हें ध्येय नसून उत्तम शिक्षक होणें हें ध्येय असतें. पण प्रत्यक्ष अनुभवांत तसें पूर्णपणें येत नाहीं. तर त्या परीक्षेच्या पाठीस लागल्यानें उत्तम शिष्य मात्र बनतात. तसेंच स्त्रीशिक्षणाचें आहे. तिकडील देशांमध्यें मुलींना हल्लीं जें शिक्षण मिळत आहे. त्यामुळें समान हक्काचें वेड, गृहिणी पदाचा कंटाळा, मातृपदाच्या जबाबदारीची टाळाटाळ, सात्विक विचाराची व त्यामुळें गुणाची हानी व **कठोरतेची वाढ** हे गुण स्त्रियांमध्यें वाढत्या प्रमाणावर दिसून येतात. त्यांची स्वातंत्र्याची आवड वाढते व त्यामुळें गृहिणीपदाचें ओझें गळ्यांत नकोसें वाटतें. जरी यदाकदाचित् तें असलें तरी निदान मातृप्रेमाची शृंखला तरी आपल्या पायांत असू नये अशी त्यांची इच्छा वाढते व हळूहळू वत्सलता कमी होऊन स्त्रियांच्या अंगीं स्वाभाविकपणें असणारा मृदुपणा जाऊन त्या जागीं **एकलकोंडेपणा, तिरस्कार** व कठोरता हीं वाढत जातात. व मग हळूं हळूं त्या बायकांच्या पुरुष बनतात. तेव्हां अशा प्रकारची स्थिती हिंदु समाजांत होऊं नये. निदान शेजाऱ्याचें उदाहरण पाहून तरी आपण जास्त शहाणें व्हावें हें योग्य होय.

## हिंदु समाजांतील स्त्रीशिक्षणाचें पुढील ध्येय.

हल्लीं आपल्यामध्यें जीं मुलींचीं कॉलेजं व ज्या शाळा आहेत त्या बहुतेक थेट मुलांच्या धर्तीवर आहेत. हल्लीं आह्मी मुलींना जें शिक्षण देतों तें असें कीं, त्यांना आपण मुली आहों असें कळूं न देण्याचें ! तेव्हां त्याचा परिणामही तसाच झाल्यास नवल काय सध्यां पुष्कळांचें असें मत पडतें कीं, मुलींना लहानपणापासून आपण बायको आहों हें वाटतां कामां नये. पण मीं ह्मणतें, असें कां ? समजा कीं, एखाद्याची गरीबी आहे; आणि त्याला मूल आहे. तेव्हां कोणी ह्मणेल कीं, त्याला लहानपणासून गरीबीची कल्पना येऊं देऊं नका. कारण त्यामुळें त्याच्या मनास धक्का बसेल. पण शहाणी माणसें असें ह्मणणार नाहींत. त्याला जर लहानपणापासून आपली खरी स्थिती कळेल तर तो चैनी व आळशी निघणार नाही, किंवा त्याला पोकळ ऐट दाखविण्याचा मोह उत्पन्न न होतां तो बेताबातानें, काटकसरीनें व टापटिपीनें राहून लोकांचें लक्ष्य पैशानें नाहीं पण गुणानें वेधण्याचें प्रयत्न करील; व त्यास तसें करूं देणे योग्य आहे. तसेंच आरंभाला जरी कांहींवेळ मुलींना आपण मुली आहों हें कळूं देणें इष्ट वाटलें नाहीं तरी पण हळूहळू त्यांना तें कळूं देणेंच हितावह आहे, व त्याप्रमाणें तें कळतेंही. पण पाहिजे तितके लवकर त्यांच्यामध्यें स्त्रीत्वाची भावना उत्पन्न न केल्यानें त्यांना मुलांच्या कांहीं सवई जडतात व त्या सिंधा वयाला मात्र त्रास पडतो. तेव्हां जों पर्यंत आपल्याला स्त्रियांना स्त्रीत्वापासून दूर करावयाच्या नाहींत तोंपर्यंत हल्लीं स्त्रियांच्या करितां ह्मणून जो शिक्षणक्रम अस्तित्वांत आहे तो बरोबर नाहीत,

आहे तो चुकीचा आहे असें ह्मणावें लागेल. आता कोणी ह्मणेल कीं, असे उदाहरण दाखवा. तर अद्याप आपल्याइकडे स्त्रीशिक्षणाचा आरंभ आहे; पण जेथें तें मुबलक झाले आहे तिकडे पहा; शिवाय ज्यांना बारकाईनें पहाण्याची संवय आहे त्यांना आमच्याकडेसुद्धां बीजरुपाने तें पहावयास मिळेल. मी स्वत. जरी स्त्रीशिक्षणाची पूर्ण अभिमानी आहे तरी हल्लीं स्त्रियांना जे मुलांच्या नमुन्याचें शिक्षण मिळतें त्यामुळें स्त्रिया गृहिणी व मातृपदाला योग्य होणार नाहींत असे मला वाटते. व केव्हांही झाले तरी स्त्रियांचें शिक्षण उत्तम गृहिणी व उत्तम माता ह्या पदवीकरितांच असावे असे सर्व-साधारण समाजाला वाटणारच. अगदी वरिष्ठ दर्जाचे श्रीमंत व संस्थानिक लोक सोडून व मध्यम स्थितींतिल विधवा सोडून उरलेल्या लोकांसंबंधानें आज ही चर्चा आहे. कारण श्रीमंत लोकांना आपल्या मुलींना हवें तसें शिक्षक ठेवतां येतात व विधवांचा प्रश्न तर अगदींच निराळा! तेव्हां आतां मध्यम कुटुंबांतील सरसकट मुलींच्याकरितां पहावयाचें तर आमच्या मुलींना चांगलें शिक्षण मिळालेच पाहिजे. पण त्यांत त्यांच्या पाठीमागें पदव्यांची ओढ नको. कारण त्यांच्या शिक्षणाची परीक्षा पदव्यांच्या आंकड्याने न होतां त्यांच्या कर्तव्यानेच होते. तेव्हां त्यांना पुढे जे गृहिणीपद किंवा मातृपद मिळवावयाचे आहे त्याची जाणीव शिक्षण देणारांच्या व घेणारांच्या मनांत सारखी पाहिजे. हल्लींच्या मुलांच्याप्रमाणे मिळणाऱ्या शिक्षणाचा परिणाम असा होतो कीं, त्यांना मुलांप्रमाणे

पदव्या मिळविण्याची इच्छा उत्पन्न होते व आपण मुलांच्यापेक्षां कोणच्याही तऱ्हेनें कमी नाहीं असें दाखवावेसे त्यांना वाटते. ही अहमहमिका चुकीची आहे. कारण जेथें दोघांचे रस्ते निराळे तेथें ह्याची जरूरच काय? उदर निर्वाहाकरितां शिकणें हा कांहीं स्त्रीशिक्षणाचा अंतिम हेतू खरा नाहीं. तो एक अडचणीच्या वेळेचा मार्ग आहे. बाकी खरें पाहतां बाह्य जिवनाची चढाओढ हें पुरुषांच्या रांकट स्वाभिमानाला योग्य आहे व मृदुता, कोमलता ह्या गुणांचा विकास हें स्त्रीस्वभावाचें खास लक्षण आहे व याची वाढ होण्याजोगें शिक्षण त्यांना मिळून त्यांचीं मधुर फळें त्यांच्या मार्फत पुढील पिढीला मिळण्याची आह्मीं आशा बाळगतों. पण हल्लींच्या शिक्षणाचें तसें होणार नाहीं. बायकांना खोट्या शिक्षणाची गोडी लागेल व त्यामुळें त्यांना संसारपाशाचा कंटाळा येईल व मातृप्रेमाची बिडी पायांत न पडण्याकरितां त्या सदा धडपडतील; आणि एकदां कां त्यांना संसारपाशाचा कंटाळा आला ह्मणजे त्या स्वतंत्रतेकरितां अगर पोटभरण्याकरितां नोकरीच्या मागें लागतील. आणि तसें झालें ह्मणजे हळुहळू संसारांतील निरनिराळ्या व्यक्तींच्या गांठी पडून पुष्कळदां त्यांना चांगल्या वाईटाशीं झगडावें लागेल व मनाला मोह पाडणाऱ्या अनेक इंद्र जालांतून त्यांना मोठ्या मुष्किलीनें बाहेर पडावें लागेल व इतकेंही करून शेवटीं आपल्याला जगांत जवळचें असें खरें प्रेम करणारे कोणी नाहीं अशी रुखरुख त्यांना लागेल. सारांश हल्लींच्या शिक्षणाचे असे कांहींतरी चमत्कारिक परिणाम होतील. त्यांना

संसार व संसारांतील कामें कंटाळवाणीं वाटतील. सारा दिवस त्यांच्या संबंधानें काम करावें लागतें अशीं व स्वतःचीं मुलें नकोशीं होतील व संसारांतील कर्तव्यें व मुलांची व्यवस्था झाल्यानंतर उरलेला वेळ जो हल्लींच्या स्त्रिया ईश्वर, वेदांत वगैरे संबंधानें आपल्या समजुतीप्रमाणें ऐकण्यांत, वाचण्यांत घालवितात व ज्यापासून निदान कांहीं क्षण तरी बाह्य जगाचा विसर पडून त्या सात्विक विचारांकडे वळतात. तेंही नाहींसें होईल. कारण मग नेहमीं जीवनकलहाची चढाओढ, मनाची अशांतता, ह्यांत वेळ जावयाचाच. कारण स्वभावतःच स्त्रियांना संसार प्रिय असतो व जीवनकलहाचा कंटाळा असतो. त्यांत आरंभाला कांहीं वेळ बरें वाटलें तरी तें सारखें टिकत नसतें. पण स्वतंत्रतेच्या खोट्या आमिषामुळें त्या संसारांत पडावयाला भितात व त्यामुळें मनाला नेहमीं असंतोष वाटतो. ह्मणून स्त्रियांना जें शिक्षण द्यावयाचें तें मुलांच्यापेक्षां अगदींच निराळ्या तऱ्हेचें पाहिजे आणि तें त्यांच्या संसारांत कसें उपयोगीं पडेल हें बघून त्याप्रमाणें त्यांचा कार्यक्रम ठरविला पाहिजे. नाहींतर मुलांच्यासारख्या शिकविणाऱ्या कॉलेजांनीं पुढील मुली दाढीमिशाशिवायचे पुरुष बनतील. आणि एकदां कां ही गोष्ट आपल्या हातांतून गेली ह्मणजे मग ती सुधारणें जड जाईल.

आतां कोणी ह्मणेल कीं, ज्यांना लग्न न करितां रहावयाचें असेल त्यांचें ? तर आतां लग्नाची मर्यादा हळु हळु वाढतच आहे

व ती १५—१७ वर्षांपर्यंत अगदीं सहज जाणारच. एवढ्या अवधींत साधारणपणें मुलींची प्रपंचाकडे गोडी आहे कीं नाहीं हें सहजच समजतें. तेव्हां त्यांना तशा प्रकारची गोडी नाहीं असें वाटेल त्यांना पाहिजे तर मुलांच्या शाळेंत लग्न न करण्याच्या निश्चयानें पाठवावें. पण सर्वसाधारण मुलींकरितां अशी कांहींतरी सोय झाली पाहिजे. कारण आपण ज्या शाळा, कॉलेजें, संस्था वगैरे काढतो त्या समाजांतील सर्वसाधारण लोकांकरितां काढतो विशिष्ट व्यक्तीकरितां नव्हे. तेव्हां त्या सर्वांना सोईचें काय पडेल तें पाहिलें पाहिजे. आणि त्या बरोबरच आपल्याला आनंद कशानें होईल, सुख कशानें लागेल हेंही बघितलें पाहिजे. सर्वसाधारण विचार करितां पुरुषांची इच्छा आपल्याला उत्तम पत्नी मिळावी अशी असते. पत्नी ह्मणजे मित्र हें जरी खरें तरी पण तिनें मित्रापेक्षां गृहिणीचीं कर्तव्यें केलेलीं पुरुषांना जास्त आवडतील. ह्मणजे तिनें गृहमित्र ह्मणा अथवा गृहिणी ह्मणा असें असावें अशी त्यांची कल्पना असते. कारण त्यांना नुसत्या बाहेरच्या गोष्टींत उठाठेव करणारा अथवा सल्ला देणारा मित्र नको असतो. कारण तसे मित्र त्यांना बाहेर पुष्कळ मिळतील. पण मध्यान्हीची वेळ आली ह्मणजे क्षुधेला शांत करून बाह्य जगापासून विसर पडणारी ह्मणजे विश्रांतीचें स्थान वाटणारी अशी पत्नी ह्मणजे गृहमित्र पाहिजे. हल्लींच्या शिक्षणानें स्त्रिया तशा मित्र न होतां पुरुषमित्राप्रमाणें बनतील इतकेंच नव्हे तर त्या अबला ह्मणून त्यांचा विशेष हक्क, विशेष मान असल्यामुळें या आपल्या

बरोबरीच्या मित्राचा पदोपदीं बंदोबस्त ठेवतां ठेवतां पुरुषांच्या नाकीं नव येतील. मग कादंबऱ्यांतून दिसणारी नंदनवनांतील गृहसौख्यें व सुशीलेचा स्वयंपाकघरांतील सुग्रणपणा अजिबात नाहींसा होईल. इतकेंच नव्हे तर स्वतंत्रतेच्या आमिषानें बायकाही पुरुषांप्रमाणें पोटाच्या पाठीमागें लागल्या ह्मणजे भोळ्या भाबड्या कल्पनेप्रमाणें कां होईना पण ज्या देवाच्या अस्तित्वाच्या कल्पना उगीच समाजांत चालू आहेत आणि त्यामुळें थोडासा तरी जो आमचा धर्म तगला आहे तोही समूळ नामशेष होईल. आणि इतकेंही करून ज्या सुखाच्या कल्पना आज सर्वांना दिसत आहेत त्या जाऊन तेथें असंतोषाचें भयंकर बीं रुजेल. तेव्हां असें न करितां मुलींसाठीं कर्वे यांचे प्रमाणें स्वतंत्र शाळा नवीन विशेष पद्धतीवर स्थापिल्या गेल्या पाहिजेत. मुलांच्याकरितां स्वतंत्रशाळा काढल्या असतां सरकारच्या परवानग्यांची अडचण पडते. पण मुलींच्या शाळांसंबंधानें कांहीं तसें नाहीं. तेव्हां त्या काढण्यारितां आमचे पुढारी कोणी पुढें कां होत नाहींत? अशा प्रकारच्या शाळा दरेक मोठ्या गांवांतून स्थापन होण्याजोग्या आहेत. तर तशा प्रकारच्या शाळा स्थापन झाल्यावर त्यांत कशा प्रकारचा शिक्षणक्रम ठेवतां येईल ह्याचा थोडक्यांत विचार करूं. सरसगट पहातां अशा शाळांतून आठ वर्ग करितां येतील. त्यांतील पहिल्या ३ वर्गांत म्युनिसिपालिटीच्या शाळांप्रमाणेंच अभ्यासक्रम थोडासा फेरफार करून ठेवितां येईल. त्याच्या पुढील ५ वर्षांत उत्तम मराठी, व्यवहारोपयोगी गणित, थोडें

संस्कृत, लिहितां वाचतां येण्याजोगे इंग्लिश. शरीरशास्त्राची थोडी माहिती, आरोग्यासबंधानें माहिती गोष्टीरुपानें इतिहास, थोडा भूगोल, शिवणकाम, अक्षर, तोंडचे हिशेब, ड्रॉइंग, व गाण्याचें थोडें ज्ञान वगैरे हे विषय वर्गवारीनें व कांहीं ऐच्छिक ठरवून ठेविल्यास मुलींना १५।१६ वर्षांपर्यंत पुष्कळ गोष्टींचें ज्ञान होईल व अशा शाळांत लग्न झालेल्या मुलींना व मोठ्या स्त्रियांना सुद्धां एखाद्या आवडीच्या विषयापुरतें जातां येईल व त्यामुळें स्त्रियांमध्यें शिक्षणाची जास्त गोडी उत्पन्न होईल. शिवाय अशा शाळांतून बायकांकरिता एखादी लायब्ररी ठेविल्यास पुष्कळ बायका तिचा उपयोग करूं शकतील आणि इतपत शिक्षण मिळालेल्या मुली आपल्या आवडीप्रमाणें पुढें तें घरच्याघरीं वाढवूं शकतील; व ज्यांना तशा प्रकारची सवलत मिळणार नाहीं त्यांना उत्तम गृहिणी, उत्तम माता व्हावयास अशा शिक्षणाचा चांगला उपयोग होईल. आणि त्यामुळें त्यांचें विचार सात्विक बनून त्यांच्यापुढें मुलांतही ती छटा राहील. सारांश स्वतंत्रतेच्या खोट्या कल्पनेनें आपलें डोकें भरकटून न सोडतां उत्तम गृहिणी, उत्तम पत्नी व उत्तम माता होणें हेंच स्त्रियांचें आद्यकर्तव्य अशाप्रकारच्या कल्पना त्यांच्या डोक्यांत नेहमी घोळतील. अशा प्रकारच्या संस्था सध्यां आह्मांला पाहिजे आहेत. आतां कोणी ह्मणेल कीं, ह्याच्यापुढें जाऊन विशिष्ट कर्तव्य करण्याची ज्यांची इच्छा आहे. त्यांना तुह्मी बांध कां घालतां ? तर ह्यानें त्याला बांध घातला जाणार नाहीं. एवढ्या शिक्षणानें मुलींचें मूलतत्वात्मक गुण खुलतील. व

ज्या कोणा विशिष्ट व्यक्तीला ह्याच्यापुढें जावयाची इच्छा होईल ती आपल्या आपणच पुढें जाईल. पण सर्व साधारण स्त्रियांचें कांहीं तें ध्येय नव्हे. आतां विधवांना मात्र तशा प्रकारचा शिक्षण क्रम घेतां येईल. पण त्यांनासुद्धां सर्व प्रकारचें शिक्षण मुलांच्या बरोबरीनेंच मिळवण्याची जरूर नाहीं. तर कांहीं विशिष्ट नर्स अगर स्त्री डॉक्टर धंद्यापुरतेंच शिक्षण त्यांना पुरुषांच्या बरोबरीनें मिळालें ह्मणजे झालें. कारण समाजाला अशा सामाजिक मातांची, भगिनींची अतिशय जरूर असतें. समाजाला अज्ञानांतून बाहेर काढावयाला धार्मिक शिक्षण देणें त्यांच्यामध्यें भ्रातृभावना वाढविणें त्यांना नीतिशिक्षण देऊन तारणें, रोगानें दुःखित असतांना मातृप्रेमानें त्यांचें संरक्षण करणें, आपत्तीकाळीं भागिनीप्रमानें धीर देणें, अविचाराच्यावेळीं झणझणीत व अधिकारयुक्त वाणीनें समाजाच्या डोळ्यांत अंजन घालणें अशा प्रकारचीं कितीतरी कामें त्यांना करितां येण्याजोगीं आहेत, व तीं करण्याकरितां जरूर त्याप्रकारचें शिक्षण मिळवण्याला त्यांना कोणीही आड येणार नाहीं. उलट सुशिक्षित स्त्रीपुरुष त्यांना खात्रीनें पाठिंबा देतील. तरी ज्या गोष्टी आपल्या हातांत नाहींत त्याकारितां न थांबतां ज्या गोष्टी आपल्या हातांत आहेत त्याचा उपयोग करून आपल्या समजांतील दरेक स्त्रीला सुशिक्षित करण्याचें व्रत स्वीकारा व त्यासाठीं ज्यांत उत्तम गृहिणी होतील अशा प्रकारच्या शाळा काढण्याच्या प्रयत्नाला शुभस्यशीघ्रं ! ह्मणून आरंभ करा.



# भावी पिढीचा पहिला शिक्षक.



हल्लींचा काळ शिक्षणाचा आहे. तें कसें असावें, कोणच्या तऱ्हेचें असावें, ह्याबद्दल नेहमीं चर्चा चालते. कोठेंही पहा! चार सुशिक्षित मंडळी जमून गप्पा गोष्टी सुरूं झाल्या आणि त्यांत शिक्षणाचा प्रश्न निघाला नाहीं असें नाहीं ज्याप्रमाणें लोक ह्यांत लक्ष घालूं लागले आहेत, त्याचप्रमाणें सरकारही त्यांत मन घालून बारकाईनें पाहूं लागलें आहे, आणि मुलांचें शिक्षण निर्दोष होण्याकरितां काय केलें पाहिजे ह्याचें निरीक्षण करून उपाय सुरूं झाले आहेत. सरकारी शाळांतून पूर्वीचे असलेले अनट्रेन्ड [ Un Trained ] शिक्षक काढून टाकून त्यांच्या ऐवजीं ट्रेनिंग कॉलेजांतून निघालेले शिक्षक नेमीत आहेत. त्यांच्या क्रमिक पुस्तकांतून फेरफार होत आहेत. त्यांच्या खेळण्याच्या जागा, वाचनाचें वातावरण शुद्ध आणि स्वच्छ राहून त्यांना ज्ञान कसें मिळेल, त्यांचे विचार कसे वाढतील, ह्या संबंधाची काळजी करण्यांत सरकार, सरकारी अधिकारी आणि म्युनिसिपालिट्या गढून गेल्या आहेत. सारांश, हा काळ ज्ञानार्जनाचा व उद्योगाचा आहे. तेव्हां अशा वेळीं मी सुद्धां अशाच एखाद्या शिक्षणाचा विचार केल्यास गैर होणार नांहीं हल्लीं लोक ज्या शिक्षणाच्या व्यवस्थेंत गढून गेले आहेत तो

व्यवस्था लांबची आहे. जसे झाडाला मोहोर लागल्यावर त्याला जपून त्याच्यापासून येणाऱ्या फळांचें संरक्षण कांहीं लोक करितात तसें हें आहे. ह्मणजे ह्या संरक्षणाची जरूरी नाहीं असें कांहीं नाहीं. ते न केल्यास आपले उत्पन्न जाईल, अपरिपक्व फळें खाण्यानें लोक आजारी पडतील व चांगले आणि स्वादिष्ट फळ खाण्यानें लोकांना जो आनंद झाला असतां त्यापासून त्यांना मुकावे लागेल, ह्मणून त्यानंतरच्याही संरक्षणाची जरूरी आहे. त्याचप्रमाणें किंबहुना त्याहूनही त्याचे बीज जास्त लाविल्यापासून तें चांगलें आणि निकोप येण्याकरितां जपण्याची जास्त जरूरी आहे व चांगलें बागवान तसें करतातही. पण माणसासंबंधानें मात्र तसें होत नाहीं. कारण मीं वर सांगितलेले सर्व उपाय मुलें लोकांच्या ह्मणजे शिक्षणसंस्थांच्या हातात गेल्या नंतरचे आहेत. पण मुलांच्या शिशुपणीं त्यांच्या अज्ञात स्थितींत त्यांचें पालन करणारा, त्यांना शिक्षण देणारा पहिला शिक्षक जी माता, तिच्या संबंधाचा विचार मात्र फारसा केलेला ऐकूं येत नाहीं. कांहीं चांगल्या बुद्धीची—ज्यांना आपण तैल बुद्धीचीं ह्मणतो—अशी माणसें लहानपणीं शिक्षणाची आबाळ होऊनसुद्धां चांगल्या तऱ्हेनें नांवारुपास येतात. पण त्यांनाच लहाणपणाचा पहिला शिक्षक जर त्याहूनही चांगला मिळाला असतां तर तीं झालीं त्यांहूनही कदाचित् जास्त चांगली निघाली असतीं. निदान त्यांना आपली बुद्धी आपल्या आपण वाढविण्यास व ती भोंवतालच्या परिस्थितींत बाहेर काढण्यास जे श्रम व बुद्धीचा जो अपव्यय करावा लागला तो न लागतां त्यांत

त्यांनी दुसऱ्या कांहीं गोष्टी केल्या असल्या शिवाय सर्वच माणसें कांहीं अशीं निवतात अशीं नाहीं. तेव्हां सर्वसाधारण माणसां करितां तरी चांगल्या शिक्षणाची जरूर आहे ह्मणून त्याचा विचार आधी झाला पाहिजे.

हल्लींच्या बदलेलेल्या परिस्थितींत स्त्रीशिक्षणाची मंदगतीनें कां होईना, वाढ होत आहे व ज्या थोड्या फार स्त्रिया शिकलेल्या आहेत त्या थोड्याफार प्रमाणानें सामाजिक बाबतींत मन घालीत आहेत. करमणूकीकरितां ह्मणून हमेशा बाहेर पडणारी मासिकें वगैरे वाचीत आहेत व त्यामुळें स्त्री शिक्षण, बालसंगोपन, समाज सुधारणा राष्ट्रोन्नती वगैरे शद्ब त्यांच्या कानावर पडत आहेत. तेव्हां मुलांच्या शिक्षणाच्या प्रश्नाचा विचार करावयास आता कांहीं हरकत नाहीं. तेव्हां आतां ह्या कामी सुशिक्षित भगिनींनी जास्त नेटानें प्रयत्न करावयास पाहिजे आणि ह्या गोष्टीचें महत्व आपल्या दुसऱ्या अज्ञान भगिनींच्या मनांत भरविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. माझ्या बंधूवर्गानेंही ह्या कामी आपल्या सहानुभूतीचा व कळकळीचा जास्त औदार्यानें उपयोग केला पाहिजे. कारण बंधूहो, आपण हें लक्षांत आणा कीं, आपण पुढें ज्या चांगल्या चांगल्या योजना कारितां त्या योजनांचा अंमल ज्यांच्यावर करावयाचा तीं बालकें आधीपासून ज्या मानानें तयार असतील त्या मानानें पुढील कार्य करण्यास तुह्माला जास्त सुलभ किंवा अवघड जाईल. तेव्हां त्यांना पुढें शिक्षण देणाऱ्या शिक्षकाच्या ज्ञानाची

काळजी घेण्यापूर्वी आपल्या बालकांचा पहिला शिक्षक जी त्यांची माता तिच्या ज्ञानाची काळजी घ्या.

त्याचप्रमाणें भगिनींनो आजपर्यंत झालेल्या हानीचा विचार न करितां आतां पुढें येणारी भावी पिढी योग्य तऱ्हेनें वाढण्यास व सुशिक्षित होण्यास काय करतां येईल त्याचा आपण आधीं विचार करा. मूल जन्मास आल्यापासून तों तें शाळेंत जाईपर्यंत त्याला नेहमी आईचा सहवास असतो. तेव्हां त्याच्या अज्ञानदशेंत त्याच्या शारीरिक पोषणाचें ज्ञान ज्याप्रमाणें आईला लागतें, त्याचप्रमाणें तें बोलूं फिरूं लागल्यानंतर त्याच्या ज्ञानतंतूंना वाढ देण्याचें ज्ञान आईला जरूर पाहिजे. मुलें अज्ञान दशेंत असतांना त्यांना चांगल्या संवई ज्यामुळें लागतील व प्रेम, नीति, ईश्वराची भक्ति, कळकळ, वगैरे गुण वाढून त्यांचा योग्य उपयोग कसा करावयाचा ह्याचेंही ज्ञान त्यांचें शक्तीप्रमाणें त्यांना मिळालें पाहिजे. कांहीं गोष्टींची अशी मौज असते कीं, त्या लहानपणीं मनावर इतक्या कांहीं दृढ बसतात कीं, तो मनुष्य कितीहि मोठा झाला तरी त्याच्या पासून दूर जात नाहींत. तेव्हां अशा ह्या वयांत त्यांच्या मनावर चांगलें संस्कार, चांगले विचार बसविण्याची किती जरूरी आहे हें कोणीही कबूल करील. तेव्हां तें शिक्षण देणाऱ्या मातेला स्वतःचें ज्ञान किती वाढविलें पाहिजे ह्याची सहजच कल्पना होईल. स्वाभाविकरीत्याच मुलांना गोष्टी फार प्रिय असतात. व वेळ जाईनासा झाला ह्मणजे किंवा रात्रीं निजतांना बहुतकरून मुलें

आई, गोष्ट सांग ह्मणतात! अशा वेळीं त्यांना गंमत वाटून करमणूक होण्याजोग्या आणि त्यांच्या वयाला व शक्तीला झेपतील अशा गोष्टी योजून सांगाव्या व त्याबरोबरच कांहीं तरी सारही त्यांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न करावा. तसेंच पुष्कळ मुलें पुष्कळ वेळां कांहीं विचित्र प्रश्न विचारतात आणि त्याचें उत्तर ठाऊक नसल्यास कांहीं तरी थाप मारून आया पुष्कळ वेळीं वेळ मारून नेतात. तसें न करितां 'बाळ मला माहीत नाहीं,' असें स्वच्छ सांगावें ह्मणजे वृथा अभिमानाची संवय बालकांना लागणार नाहीं. त्याचप्रमाणें लहानपणीं मुलें घरीं आलीं ह्मणजे त्यांचा पहिला प्रश्न विचारावयाची जागा ह्मणजे आई! तेव्हां त्या आईला ज्ञानाची किती जरूरी आहे याची सहजच कल्पना होईल आणि ती ज्या मानानें हुशार, विद्वान, प्रामाणिक, नीतिमान व आनंदी असेल, त्याच मानानें अर्थात मुलेंही व्हावयाची. तेव्हा भगिनींनों उठा आणि आपला भावी पिढीचा पहिला शिक्षक जी माता ती सदैव शुद्ध व ज्ञानवंत करण्याच्या तजवीजीला लागा. बंधूनों, आपण उत्तम शिक्षकाची जी कच्च्या पायाची इमारत करीत आहां ती सुशिक्षित माता उत्पन्न करून पक्क्या पायाची करा. आणि हें सामाजिक कार्य दोघांच्या संमतीनें करून भावी पिढीला पहिला शिक्षक चांगला दिल्याचें पुण्य संपादन करा अशी विनंती करून हा लहानसा लेख मी पूर्ण करते.



# महायुद्धापासून हिंदी स्त्रियांनां काय शिकता येईल?



महायुद्ध संपलें पण त्या मुळें सगळ्या जगाला नवी दृष्टी प्राप्त झाली आहे. युरोप, अमेरिका, चीन, जपान आपल्या दृष्टीनें बघतात, तर तिकडे लेनिनचा पक्ष तयार होतो. व इंग्लंडचे राजकारणी निराळा विचार करितात. व्यापारांत जर्मनला मागें टाकता आले मुळें जपान आपल्याला कसें पुढें सरता येईल हें बघतो, व बहुतेक जगांतील सर्व राष्ट्रें ह्यांत गुंतली असल्या मुळें युद्धाच्या समाप्ती नंतर ही जी नवी घडी बसत आहे, व जें नवें युग सुरू होत आहे तें सगळीकडे आहेच. त्याचा विचार जो तो आपल्या दृष्टीनें करणार. व्यापारी, राजकारणी, मुत्सद्दी वगैरे यांत आपल्याला काय शिकतां येईल हें बघतातच आहेत. अशावेळीं आह्मी स्त्रियांनीं गप बसून चालणार नाहीं. आह्माला सुद्धां विचार करून बघितलेंच पाहिजे, कीं ह्या पासून आह्माला काय शिकतां येईल.

मला वाटतें आह्मा हिंदी स्त्रियांना सुद्धां त्यापासून बोध घेण्याजोगें कांहीं तरी मिळेल. आज कित्येक वर्षे पाश्चात्य देशांत स्त्री शिक्षणाची इतकी झपाट्यानें वाढ होत आहे कीं, दरेक कृत्यांत स्त्रिया, पुरुषांची स्पर्धा करण्यास तयार होत आहेत

युद्धापूर्वीं स्वातंत्र्या संबंधानें त्यांच्या कल्पना इतक्या पुढें गेलेल्या होत्या कीं, मताधिकारा करितां त्यांना राजकर्त्यांशीं बंड करावयाचा प्रसंग आला होता; स्वातंत्र्यतेच्या हौशिनें त्यांच्यातील अविवाहीत कुमारिकांची संख्या सारखी वाढत होती. कॉलेज, शाळा, हॉस्पिटल नाटक गृह व्यापारीपेठ जिकडे पहावे तिकडे पाश्चात्य युवतींनीं आपलें आस्तित्व दाखविलें होतें. साहित्यसेवा धर्मप्रसार वगैरे सर्व ठिकाणीं पाश्चात्य युवती आहेतच. सरांश ह्या पन्नास पाऊणशें वर्षांत स्त्री शिक्षणाचा प्रसार इतका झालेला होता कीं, आरंभाला त्याचे चांगले वाईट परिणाम बघण्याकडे सुद्धां कोणाचे लक्ष गेले नाहीं. पण हल्लीं मात्र त्याचे चांगले वाईट परिणाम जगाला दिसूं लागले आहेत त्यापासून कांहीं फायदा व नुकसान ही झाले असेल, हें सर्व जरी खरें तरी लढाई सुरु झाल्या बरोबर त्यांच्या स्त्रियांनीं त्यांनां जी मदत केली ती खरोखर अवर्णनीय आहे १८ वर्षा पुढील व ५० शीच्या आंतले बहुतेक पुरुष लढाईवर गेल्यामुळें त्यांच्या रिकाम्या पडलेल्या जागा तेथील स्त्रियांनीं भरून काढिल्या. मताधिकारासाठीं भांडण्याला पुढें येणाऱ्या बायकांनीं सर्व तंटा तातपुर्ता गुंढाळून ठेऊन तन, मन, धन देऊन राष्ट्र कार्यांत पडल्या होत्या. पोलिसांत पहा, बायका. शेती कोण करते? बायका. पोष्टांत जा, बायका. यंत्राच्या कारखान्यांकडे पहा, बायका. सारांश जेथे जेथें कार्य कर्त्यांची

उणीव पडेल, तेथें बायका तीं कामें करायला हजर होत्या. हें कशामुळें झालें? तर शिक्षणानें, असें ह्मणणें आपल्याला भाग पडेल. कारण मनावर शिक्षणाचा एक प्रकारचा संस्कार घडलेला असतो. त्या संस्कारामुळें माणसाला थोड्याश्या श्रमानें हव्या त्या कामांत हात घालता येतो. पण हीच वेळ हिंदुस्थानावर आली असती अशी कल्पना करा! तर आह्माला काय करता आलें असतें? आमचे लोक ह्मणतात बायकांना शिक्षण किती पाहिजे तर साधारण मराठी पुस्तक वाचता यावे, एकादे पत्र लिहिता यावे, जेम नेम घरांतला खर्च मांडावा फारतर मुलांना थोडिशीं मुळाक्षरें नी उजळणी शिकविता आली कीं झालें त्याच्याही पुढें मजल मारावयाची ह्मणजे थोडेसें इंग्रजी र ट फ करता यावे कीं, स्वर्गाला हात पोंचलें. कारण ह्या पेक्षां कांहीं जास्तिची बायकांना जरूर आहे असें आह्माला वाटतच नाहीं. आज पर्यंतची परिस्थिती पाहतां आमच्या इकडे ज्या पुढें आलेल्या अशा शिकलेल्या बायका आहेत त्यांचे काम पाहिल्यास त्यांनी जे लेख वगैरे लिहावयाचे ते स्त्री शिक्षण, बाल संगोपन, गृह व्यवस्था वगैरे वगैरे झालं. ह्याचा अर्थ ह्या बाहेरच्या कार्य क्षेत्राचा कधीं विचारच झालेला नाहीं. आमची जुनी परंपरा आणि राहणी ही पाहिली ह्मणजे त्यामुळें भागतें असे खरें. पण त्यावेळीं वरच्या दर्ज्याच्या कुटुंबांतील स्त्रिया आपल्या वेळेचा उपयोग परमार्थ मार्गाकडे करून नरी

थोडें इश्वरी साधन मिळवीत होत्या. पण आतां, ह्या भौतिक युगास एकटा हिंदुस्थान जर ह्मणेल कीं, मी भौतिक शास्त्रा पासून दूर राहीन तर तो वेडा ठरेल.

आमचे राज्य कर्ते भौतिक शास्त्राच्या शिखरावर बसूं पाहत आहेत. त्याच्या जोरावर आजपर्यंत त्यांनीं प्रजारंजन करून आपला दाब बसवून संपत्ती मिळविली आहे. त्यांच्या तोडीला जर आपल्याला तयार व्हावयाचें असेल तर, एकतर त्या शास्त्रांत आपण आपली प्रगती करून घेतली पाहिजे; किंवा सगळ्यांनीं साधू बनून वानप्रस्थाश्रमी झालें पाहिजे. पण सद्य स्थितीकडे पाहतां आमच्या समाजाची तूर्त तरी तशी तयारी नाहीं. व्यवहारांत नेहमीं असें आहे कीं, कोणचीही गोष्ट पूर्णत्वानें झाली तरच ती समाजाला पटते. एकतर मनुष्य सर्वस्वाचा त्याग करून इश्वर भजनीं लागला आणि मग छाटी नेसून हिंडला तर मान मिळतो. पण व्यवहारांत त्या सर्व गोष्टी करणारा मनुष्य, कपड्याचा खर्च वांचविण्याकरितां जर छाटी नेसेल आणि मला चालते ह्मणेल. तर लोक मूर्ख ह्मणतील. जर एखादा ५०० रु. चा पगारदार इसम दीडहाती पंचा नेसून हिंडला तर त्याला काटकसरी न ह्मणतां कंजूष ह्मणतात. तसेंच त्यांच्या सर्व भौक्तिक साधनांचा उपयोग करावयाचा ठरेल तर, ती माहिती आपणाला नसणें मूर्खपणा होय. हल्लीं जिवन कलह वाढला आहे. इतरत्र भौतिक शास्त्राची वाढ झालेमुळें स्पर्धेमध्यें आपण मागें

पडतों, त्यामुळें दारिद्र्य आपल्यापुढें उभें आहे. एकट्या पुरुषांनीं केलेल्या कष्टानें पुष्कळांचा जिवन कलह थांबत नाहीं. अशा वेळीं दुसऱ्या जोडीदारानें मदत करणें अवश्यक होऊन बसलें आहे. आमच्या आर्य परंपरेंत प्रत्यक्ष आर्थिक बाबतींत बायकांनीं भाग घेणें खरोखरच कमीपणाचें आहे. पण काळमानाकडे पाहतां बायकांना जर जास्त शिक्षण असेल तर त्या घरांत बसून अन्यतऱ्हेनें पुरुषांना मदत करूं शकतील. शिवाय हल्लींची आमची परिस्थिती पहा किती विचित्र आहे ती. हल्लीं आमच्यांत मुलीचें लग्न करतांना बहुधा साधारण शिकणारा नवरा पाहून मुलगी देण्याची वहिवाट आहे आणि अशा मुलाला बहूतकरून मागें पुढें फारसें कांहीं नसतेच. अर्थात आपल्या शिक्षणाच्या बळावरच तो जे काय आपलें व बायकोचें पोट भरील तेंच खरें. ह्या मुलांनां जराशी नोकरी लागली कीं, कालमाना प्रमाणें त्यांचें विचार व त्यांनां अनुसरून आचार इतके खर्चिक झालेले असतात कीं त्यांनां मिळणारे बहुतेक वेतन त्यांतच खर्च होतें. अशा वेळीं एकाद्या मुलीवर दुर्दैवानें पतिनिधनाचा प्रसंग आला ह्मणजे तिचे हाल विचारूं नका. नवरा मेल्यानंतर चार घटकेंतच नवऱ्याच्या प्रेमाकरितां रडण्याचे बाजूला राहून तिला आपल्या करितां पोटाकरितां रडावें लागतें. त्यांत दोन चार पोरें पदरीं असलीं ह्मणजे तिचें पाप विचारूं नका. अशा वेळीं अमका एक उद्योग करून मीं माझ्या मुलांचे पोट भरीन असा आत्मविश्वास उत्पन्न होण्या-

जोगा तिला एकही उद्योग येत नसतो. अशा वेळीं ज्यांना कोणी जवळचे आप्तेष्ट आहेत अशा स्त्रियांचें ठीक पण ज्यांनां प्रेमानें जवळ ये ह्मणणारें कोणी नसतें त्यांनीं अर्थात कन्यींच्या आश्रमाची तरी वाट धरली पाहिजे किंवा स्वयंपाकाचा धंदा तरी पत्करला पाहिजे. तेव्हां या गोष्टींचा विचार नको का करावयास ? पतीच्या हयातींत ज्या बाईला कधीं उंबरा वलंडावयाचा ठाऊक नसतो तिला त्याचे मागें घरांत बसून अब्रूनें करितां येण्याजोगा एकही धंदा ऊरूं नये का ? हीं चित्रें पाहिलीं ह्मणजे दरेकाला आपलें पोट भरता येण्याजोगें कांहीं तरी साधन शिकून तयार असलें पाहिजे, असें नाहीं का ह्मणता येत ? आतां कोणी असें ह्मणेल कीं, अशा ह्या अशुभ कल्पना आधीं कराव्या कशाला ! तर त्याला उत्तर असें कीं, आपण आयुष्याचा विमा कां उतरतां. तेव्हां उत्तर एवढेंच कीं, परमेश्वरानें नेहमीं सर्वांना सुखी ठेवावें. साधनांचा उपयोग करण्याची वेळ आणूं नये. पण साधनें तयार पाहिजेत. हल्लींची आमची रहाणी व आमचें शिक्षण पाहिलें ह्मणजे खेद होतो. आमच्या शरीरसंपत्ती पाहिल्या तर एक रात्र जागरण सोसत नाहीं, घांसभर अन्न पचत नाहीं. नवऱ्याला ५० रु. मिळूं लागले कीं, २ रुपयांची मोलकरीण कामाला लागते. एक दिवस दळणाची गिरणी बंद पडली तर रडायची वेळ येईल. नोकरांची महागाई मी ह्मणते त्यांची जों जों गरज वाढत चालली तों तों ते नोकरीविषयीं बेपर्वा नी उर्मट ! आमच्या चैनी वाढत चालल्या, सोशिकपणा व

काटकपणाचा अभाव. लिहिण्या वाचण्याची किंवा कांहीं हुन्नर धंद्याच्या शिक्षणाची तर वर सांगितली ही कथा. बरें, प्रसंग पडल्यावर आह्मांला तयार करावयाचें ह्मटलें तरी ५।६ महिन्यांत उरकण्याजोगें काम नाहीं. कारण आमच्या बुद्धीवर कांहींच संस्कार घडलेला नसल्यामुळें तो उत्पन्न करण्यापासून तयारी. शिक्षणाचा थोडासा संस्कार घडलेल्या माणसाला लवकर शिक्षण देतां येतें. पण आमची वाट काय? ह्या युद्धांपासून आमच्या लोकांनां व आह्मा हिंदी स्त्रियांनां कांहीं विचार करतां येईल का? वर्णन केलेली स्थिति एका विशिष्ट जातीची नसून सर्व मध्यम वर्गांतील हिंदी स्त्रियांची आहे. अज्ञानाच्या अंधकारांतच आज सर्व हिंदी स्त्रीसमाज बुडाला आहे. पण आतां तरी त्यांना जागें व्हावयास पाहिजे आहे. कारण आतां जी स्थिति प्राप्त होणार आहे, त्यांत फार मोठा भाग स्त्रियांनां घ्यावा लागणार आहे; व तो घेण्यालायक स्त्रियांनां केल्याशिवाय आतां पुरुषांची धडगत नाहीं. आह्माला इंग्लिश वाचतां नाहीं आलें तरी चालेल, पण 'होमरूल' ह्मणजे काय हें समजलें पाहिजे. आमचे पुढारी सरकारशीं कां भांडत आहेत, त्यांचें काय ह्मणणें आहे? आमच्या राष्ट्राचा दर्जा काय आहे, त्याला कोणचें स्थान पाहिजे आहे; महान् महान् संस्कृतीनें पुढें आलेलीं राष्ट्रें कां भांडतात हें आह्माला कळायला नको कां? आह्मी तुमच्या भावी पिढीच्या माता आहोंत. आमचे विचार, आमचें मन जितकें तयार असेल तशींच आमचीं मुलें तयार होतील

ह्या युद्धानें तुह्मांला सैन्यांत दाखल होण्याचा अधिकार मिळत आहे. अशावेळीं आह्मांला आमचीं मुलें सैन्यांत पाठवावीं लागतील. त्या वेळेस विदुलेसारखी पात्रता आह्मांस आली पाहिजे व जिजाबाई सारखी आई आह्मांला होतां आलें पाहिजे. तर भगिनींनों उठा आणि आपली परिस्थिती बघा. अजून आपण किती दिवस निद्रिस्त राहणार? आयुष्याचा एक एक दिवस आपण घालवीत आहोंत, तो आतां कार्याला लावा. स्वतःच्या अंगांत शक्ती नसली तरी आपल्या मुलामुलींची प्रकृती सुदृढ होण्याची तजवीज आपण करा. आपल्या मुलांना धीटपणा शिकवा? व प्रसंग पडल्यास हातपाय गाळून न बसतां कांहीं तरी उद्योग आह्मीं करूं असा आत्मविश्वास मिळविण्याचा प्रयत्न करा. मोठेपणाच्या भ्रामक समजुती घालवून मनुष्याचें मोठेपण तो ज्या स्थितींत असतो त्या स्थितीवर अवलंबून नसून त्याच्या शीलावर अवलंबून आहे, ही गोष्ट आपल्या मुलामुलींच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न करा.



# आमचे सोवळें ओवळें.



हल्लीं शिक्षण पाहिजे, विशेषतः स्त्रियांनां शिक्षण पाहिजे, असें सर्वांनां वाटूं लागलें आहे. आपली राष्ट्रीय उन्नती होण्याला आपल्यामध्यें ज्या कांहीं गोष्टींची जरूर आहे त्यांत समाज सुधारणा ही एक मुख्य होय, असें पुष्कळांचें ह्मणणें आहे. ती होण्याला स्त्रियांमध्यें शिक्षणाचा प्रसार जारीनें झाला पाहिजे. त्याशिवाय स्त्रियांना सार्वजनिक कार्यें करून पुरुषांनां मदत करितां येणार नाहीं. पण जर खरोखर आमच्या पुरुषांनां स्त्रियांची उन्नती करावयाची असेल तर नुसतें स्त्रियांनां शिक्षण द्या ह्मणून किंवा मुलींना शाळेंत पाठवून भागावयाचें नाहीं. आज शाळेंत जाणाऱ्या मुली उद्यां सुसंस्कृत आया होऊन समाजकार्यें करतील तें लांब आहे. पण सध्यांच्या विद्यमान पिढीचा प्रश्न आधीं नको कां सोडवावयाला ? जातीबंधनाची कदाचित् आमच्यामध्यें जरूर नसेल आणि सर्व लोक एका ताटांत रोटी व्यवहार करूं लागले ह्मणजे आमचे राष्ट्र कदाचित् एकदम वरही येईल. पण हा प्रश्न कालावधीचा आहे. ह्या सक्तीनें अमलांत येण्याजोग्या गोष्टी नाहींत. जेव्हां सगळे पुरुष व सगळ्या स्त्रिया सुधारलेल्या पद्धतीनें शिक्षण घेऊन तयार होतील व सर्व जातपात मोडून टाकून सर्वजण हातांत हात घालून काम करावयाला लागतील तेव्हांची

गोष्ट लांब आहे. पण तोंपर्यंत कामें थांबवून कां ठेवावयाची ? तेव्हां तितकी सुधारणा होई पर्यंत आहे ह्या स्थितींत आपल्याला काय करता येईल हें बघितलें पाहिजे. हल्लीं नोकऱ्यामुळें व सभा वगैरेमुळें निरनिराळ्या जातींचीं माणसें एका ठिकाणीं जमतात व त्यांच्यांत कामाच्या महत्वाप्रमाणें संघट्टणही होतें. अशा वेळीं ४ जातींचे ४ पुरुष एकमेकांच्या येथें जाऊन गप्पागोष्टी वगैरे सर्व कांहीं करितात. पण त्यांच्यांत बहुतकरून भांडण अगर फांकडें तोंड वगैरे कांहीं होत नाहीं. तेंच उलट बायकांत पहा. त्या जर ४ जातींच्या ४ जमल्या तर एकमेकींशीं जास्त कमी बोलावयाला सुद्धां संकोच करितात. मग एकमेकींकडे जाण्या-येण्याची गोष्ट कशाला ? व जरी कदाचित् गेल्या तरी १।२ खेपावरच समाप्ति होते. कारण ब्राह्मणाची बाई जर इतर जातीच्या बाईकडे गेली तर ती तिला चहा पुढें करील. ती घेणार नाहीं. [ घेणाऱ्या असतील, पण थोड्या ] ह्मणजे तेवढ्यावर गप्प न बसतां ती बाई ह्मणेल कीं; " पुरे सोवळें, तुमचे यजमान तर घेतात. " ब्राह्मणाच्या बाईला हें आवडणार नाहीं, ह्मणजे आली जाण्यायेण्याची समाप्ति. तसेंच उलट इतर जातीची बाई ब्राह्मणाचे घरीं गेली तर तिला बैठकीवर बसून ब्राह्मणाची बाई दुसऱ्या बैठकीवर अगर खालीं बसेल. पुढें कुंकूं लावावयाची वेळ आली तर ती तें हातावर टाकील अगर खालीं ठेवील. असें झाहालें तर या बाया तरी ब्राह्मणाच्या बाईकडे कां

जातील? एखादे वेळेस एखादी बाई जरी विटाळ विटाळ ह्मणणारी नसली, तरी सुद्धां सकाळचीं वगैरे वेळ आहे आणि ती जर सोवळ्यांत असेल तर ती सहज नेहमींच्या अंगवळणीं पडलेल्या संवईप्रमाणें चटदिशीं कुंकवाचें खालीं ठेवील. पण कुंकू लाऊन घेणारी जर तिच्या जातीची असेल तर तिला कांहींच वाईट वाटणार नाहीं. पण तीच जर इतर जातीची असेल तर तिला लगेच राग येईल. तेव्हां अशा ह्या क्षुल्लक कारणामुळें बाकींच्या महत्वाच्या गोष्टी अडून रहाव्या कां? हा प्रश्न विचार करण्यासारखा नाहीं कां? तुमच्या स्त्रिया सुशिक्षित होऊन जातीभेदासंबंधानें विचार करण्याजोगी त्यांची स्थिती येईपर्यंत त्यांच्यावर सक्ती करूनही कांहीं लाभ व्हाव-याचा नाहीं. तसेंच "त्या अडाणी आहेत. बऱ्या आहेत घरांत" असें ह्मणूनही त्यांचें व त्याबरोबर समाजाचें आपण मोठें नुकसान केलें असें होईल. आज हजारो पिढ्या एकमेकांचे मनावर घडलेले संस्कार कांहीं यक्षिणीच्या कांडीप्रमाणें एकदम बदलणें शक्य नाहीं. शिवाय हे संस्कार कायम ठेऊन सुद्धां पूर्वीं निरनिराळ्या जातींच्या समजूतदार लोकांमध्यें चांगला स्नेह रहात असे. आणि तशीं चांगली उदाहरणें अजूनही बरेच ठिकाणीं पहावयास मिळतात. पुष्कळ दिवस शेजाराला राहिल्यामुळें पुष्कळ प्रभु व ब्राह्मण यांच्या घरांचा घरोबा इतका वाढतो कीं, ब्राह्मण कुटुंबांतील लहान मंडळी त्या

घरच्या वडील मंडळीला वडीलपणाचा मान देऊन दरेक गोष्टींत त्यांची सल्ला-मसलत घेत असतात; पण ह्या दोन्ही कुटुंबांत जेवण खाण्याच्या अभावीं प्रेमाचा अभाव झालेला दृष्टीस पडत नाहीं. मग आतांच हें असें कां होतें? ह्याचीं कारणें कांहीं असोत परंतु ही स्थिती सुधारणें बंधुवर्गाच्या हातीं आहे. सर्व जातींनीं थोडथोडा मनाचा मोठेपणा दाखवून एकमेकांशीं प्रेमानें वागून सार्वजनिक कामें करावयाला पुढें आलें पाहिजे व हें कसें करावयाचें तें पुरुषांनीं बायकांनां शिकविलें पाहिजे. ब्राह्मणांच्या बायकांनीं इतर जातीच्या लोकांच्या घरीं गेल्यावर किंवा त्यांच्या बायका घरीं आल्या असतांना विटाळ हा प्रश्न सोडून देऊन त्यांच्याशीं प्रेमानें मिसळावें. आपल्याला जरूर वाटल्यास किंवा घरांतील वृद्ध स्त्रियांच्यामुळें जरूर पडल्यास आपण मग लुगडें बदलावें. पण ४ बायका आपल्या घरीं अल्या असतांना 'अगबाई विटाळ झाला' 'अग, अग हळूं, शिवशील.' असें ह्मणून त्याचें मन दुखवूं नये, किंवा त्यांना कुंकू लावावयाला खालीं देऊं नये. तसें करण्यानें साहजिक त्यांना आपला अपमान झाल्यासारखा वाटतो. जर कांहीं विशेष अडचणींचे प्रसंग आहेत असें आपल्या मनाला वाटलें तर अशा वेळीं त्यांनां न बोलावणें बरें. पण जर बोलवावयाचें तर मग नीटपणें वागावें. तसेंच त्यांना आपल्या येथें बोलावून त्यांच्यापुरताच एखादा जिन्नस खावयास देणें

मुद्धां गैर दिसतें. तेव्हां त्यांना व आपल्याला खातां येईल असाच पदार्थ द्यावा. नाहींतर नुसतें पानसुपारीवरच भागवावें. तसेंच उलट शेणवी, प्रभु, मराठे; किंवा अशाच इतर जातींच्या स्त्रियांनीं सुद्धां थोडासा मनाचा मोठेपणा दाखविला पाहिजे. आपल्या येथें येणाऱ्या स्त्रियांना चहा देणें ह्मणजेच कांहीं विशेष आहे असें नाहीं. किंवा दिला असतां नको ह्मटल्यावर त्यासंबंधानें जास्त बोलणें न वाढवणें बरें. तसेंच आपण दुसऱ्याच्या येथें गेलों असतांना त्या बायका आपल्याला विटाळ होईल ह्मणून शिवल्या नाहींत अगर दुसरें कांहीं विशेष कारण होतें, ह्याचा नीट विचार करावा. तसेंच ब्राह्मणांच्या बायका आपल्या येथें चहा पाणी घेत नाहींत ह्मणून विनाकारण रागावण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. ज्याप्रमाणें शेणवी प्रभूंना मराठ्यांच्या येथें अथवा मराठ्यांना त्यांच्यापेक्षां खालच्या वाटणाऱ्या जातीच्या येथें खाणें पिणें आवडत नाहीं तसेंच हें आहे. हा आज हजारो वर्षांचा मनावर घडलेला संस्कार आहे. जसजसा शिक्षणाचा प्रसार वाढेल, कोणचें चांगलें कोणचें योग्य ह्याचा विचार करावयाची पात्रता स्त्रियांमध्यें येईल, तेव्हां त्या काळाला अनुसरून काय योग्य वाटेल तें ठरवितील. पण तूर्त थोडेसें पुढें गेल्यानें, थोडासा मनाचा मोठेपणा दाखवल्यानें कितीतरी काम होण्याजोगें आहे. आणि तो कसा दाखवावा हें जर आमचे सर्व वर्णांचे बंधू आपापल्या

स्त्रियांनां शिकवितील तर सध्यांच्या स्थितींत सुद्धां किती कामें आह्माला करतां येतील. आमच्या सर्व वर्णांच्या भगिनींमध्यें किती तरी अमूल्य गुण सांठविलेले आहेत. पण ते वेगवेगळे पेरलेल्या धान्यासारखे आहेत. तें सर्व धान्य एके ठिकाणीं केल्यास किती तरी मोठा ढीग होईल आणि हजारो अन्नान्न करणाऱ्या माणसांना जेवावयास मिळेल. पण फक्त केर काढण्याच्या लाजेमुळेंच तें धान्य फुकट जावें हें आमचें दुर्दैव नाहीं कां? एकत्र खाण्यापिण्यामुळें मनें एकत्र होतात. प्रेम वाटतें, हें खरें असेल. तरी पण रोज एका पंक्तीत एका ताटांत जेवणाऱ्या लोकांमध्यें सुद्धां एकीच्या अभावीं तंटे वां होतात? तर खरें काम करावयास जेवण उपयोगी पडत नसून काम करण्याची इच्छाच उपयोगी पडते व त्यालाही जर एकत्र खाण्यापिण्याची जोड पाहिजे असेल तर त्या जगन्नियंत्यानें ह्या भूतलावर इतके पदार्थ उत्पन्न केले आहेत कीं, आपल्या मनाच्या समजुती कायम ठेऊन कांहीं आपल्याला एकत्र खातां येतील. तर बंधूनों, बायका मूर्ख, अडाणी असें ह्मणून त्यांनां हिणविण्यापेक्षां त्यांनां त्यांच्या शक्तीच्या, पात्रतेच्या मानानें व्यावहारिक शिक्षण आधीं द्या. चार लोकांत गेल्यावर एकमेकांना कसा मान द्यावयाचा हें शिकवणें आपलें पवित्र कर्तव्य आहे व तसें झालें ह्मणजे आमच्यामध्यें एकमेकींबद्दल आदर वाढून आह्मीं हातांत हात घालून सार्वजनिक

कामें करावयास पुढें येऊं आणि आपल्या डोनयावरचा कामाचा बोजा थोडा हलका करून नवे नवे उद्योग हुन्नर वगैरेंचा शोध करून आमची राष्ट्रीय संपत्ती वाढविण्याला आपल्याला मोकळें करूं. तरी परमेश्वर करो आणि पुढील पिढी तयार होईपर्यंत विद्यमान पिढीला हें व्यावहारीक शिक्षण देण्याची सद्बुद्धी ईश्वर आपणां सर्वांनां देवो अशी प्रार्थना करून हा लेख संपवितें.



# ५ स्त्री समाजास सामान्य सूचना.



एकाद्या मोठ्या वाड्यांत आपण राहिलों म्हणजे इतर बायकांच्या चालीरीती त्यांच्या अंगांतील हुषारी वगैरे गोष्टी पाहून आपण किती मागें आहों हें कळतें, व असें कळलें कीं, साहजिकच आतां आपण काय केलें असतां त्यांच्या बरोबरीच्या होऊं अशी इच्छा उत्पन्न होते. त्याप्रमाणें इतर देशाशीं आपण आपल्या देशाची तुलना करावयास लागलों म्हणजे आपल्यांत असलेल्या उणिवा आपल्याला दिसून येतात. आणि त्या तशा दिसूं लागल्या म्हणजे साहजिकच आपल्याला त्या काढून टाकणेबद्दल इच्छा होते. पण सध्यां आपलें काय होतें कीं, आपल्याला त्या बऱ्याचशा कळत नाहींत आणि जरी कळल्या तरी पुष्कळवेळां पटत नाहींत. त्याला कारण आपलें औदासिन्यच होय. पण तें आतां आपल्याला घालविलें पाहिजे. हल्लींचा काळ स्वस्थ बसण्याचा नाहीं. सगळें जग अतिशय झपाट्यानें पुढें जात आहे. अशा रीतीनें आपण मागें पडणें हास्यास्पद आहे. तेव्हां आतां आपण बैल गाडीचा प्रवास सोडून रेल्वेचा केला पाहिजे व हें सर्व होण्यास मुख्यतः शिक्षणाची जरूरी आहे. कारण त्यामुळें वाचनांचीं साधनें वाढतात, जगाची माहिती होते, इतर देशांतील उलाढालींची कल्पना होते आणि मग आपण किती मागें आहों

तें कळतें. इंग्रजांचे राज्य आपल्या देशांत झाल्यापासून शिक्षणाचीं साधनें सोपी झालीं आहेत, पण त्यांचा आपण करून घ्यावा तसा उपयोग करून घेत नाहीं. त्यांचें राज्य इकडे झाल्यापासून आपण त्यांच्यांतील किती नव्या गोष्टी उचलल्या. पण त्यांचा उद्योगीपणा टाइमशीरपणा, विद्येची आवड वगैरे चांगले गुण मात्र ज्या प्रमाणांत पाहिजेत त्या प्रमाणांत उचलले नाहींत. जुन्या अस्सल बाळबोध ह्मणवणाऱ्या घराण्यांत सुद्धां बायकांनीं बंड्या घातलेल्या चालतात. इंग्रजांनींच आणलेल्या चहा शिवाय तुळशीचें पाणी सुद्धां सुचत नाहीं पण तेथें सुद्धां पुस्तकांना बहिष्कार. सासूबाईच्या पुढे बसून सूनबाईनें पुस्तक उघडलें की मान जातो. पण आतां मनाच्या आकुंचित कल्पना सोडल्या पाहिजेत. जर आपल्याला इतर देशांच्या बरोबर सुधारावयाचें असेल, मानमरातब पाहिजे असेल तर आतां आधीं सगळ्या सासूबाईनींच लिहिणें, वाचणें शिकवावयाचा धडा घातला पाहिजे. ह्मणजे ज्यांचे प्रत्यक्ष लिहिण्या वाचण्याचे दिवस नाहींत त्यांनीं कांहीं आतां काळ्यावर गोरेंच केलें पाहिजे असें नाहीं. पण त्यांना सुद्धां अन्य तऱ्हेनें शिकतां येईल. शिकणें ह्मणजे मन संस्कृत करणें होय व तें करावयास पाटी पेन्सिलीची गरज नसते. तें त्या शिवायहि करतां येतें. जसें आपल्याला काशीला जावयाची शक्ती नसली तर आपण दुसऱ्याकडून निदान विश्वेश्वराला नमस्कार तरी पाठवितों, त्याप्रमाणें आपल्याला जरी आतां तें करितां आलें नाहीं तरी आपल्या पुढील पिढीला तें मिळण्याचीं साधनें आपण

सुलभ करून देणें अशी इच्छा पाहिजे, ह्मणजे आपण स्वतः शिकल्याप्रमाणेंच आहे; शिवाय त्यांना उत्तेजन देऊन उत्साह उत्पन्न करणें हें काम वडील माणसांना करतां येण्याजोगें आहे. आणि त्यांच्या अशा सहानभूतीनें व मनाच्या मोठेपणानें किती तरी कार्यें होण्याजोगीं असतात. तसेंच सध्यां ज्यांना तें प्राप्त झालेलें आहे त्यांनीं ह्या बाजूचा विचार करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. इतर देश इतक्या लवकर सुधारणेच्या शिखरावर कसे चढायला लागले आणि आह्मी अद्याप कांहीं पायऱ्यासुद्धां कां गाठीत नाहीं ह्याचा आपण विचार करायला लागलों ह्मणजे आपल्याला कारणें तेव्हांच सांपडतील व अशा प्रकारची कांहीं कारणें आज आपल्या दृष्टीपुढें सुद्धां आहेत. आज आपल्यामध्यें काय काय उणिवा आहेत ह्याची पुष्कळांना जाणीव झालेली आहे. पण त्यांच्या सुधारणेचा प्रश्न आला कीं कांहीं वेळां पुरुष आमच्या बायका अज्ञानी ह्मणून आपल्याकडे बोट दाखवितात व अशा वेळीं आपल्याला तें गप बसून ऐकावें लागतें, नाहीं आपण ऐकतोंच. पण ही स्थिती आतां पालटविण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. आजपर्यंत आपण शिक्षणांत मागें कां राहिलों ह्याचा विचार करण्यास आतां आपल्याला वेळ नाहीं, तर आतां आपण पुढें कशा जाऊं ह्याचा आपण विचार करूं या. आपली स्वतःची उन्नती आपली आपण करून घेतली पाहिजे व आपल्या प्रगतींत येणाऱ्या अडचणी शोधून काढून त्या मुळासकट उपटून काढून पुरुषांच्या बरोबरीनें आपण त्यांना मदत केली पाहिजे. अशी

मदत करावयास आपण निघालों ह्मणजे प्रथम आपल्याला स्त्री शिक्षणाचा अभाव ही गोष्ट दिसून येईल. ह्याची प्रगति व्हावयाला काय काय सोई करतां येतील ह्याचा आपण सर्वांनीं एकत्र जमून वरचेवर विचार केला पाहिजे व येणाऱ्या अडचणी ताबडतोब दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तसेंच दुसरें सध्यांच्या शिकलेल्या ह्मणविलेल्या ही कांहीं स्त्रियांत बऱ्याच माहितीचा अभाव असतो. तो घालविण्याकरितां त्यांच्यांत वाचनाची गोडी वाढविली पाहिजे. ती वाढायला काय करितां येईल ह्याचा विचार आपल्याला करितां येण्या सारखा आहे. तरी तो करून त्यांच्यामध्यें कशा तऱ्हेनें वाचनाची गोडी लागेल तें शोधून काढून तसे उपाय सुरूं केले पाहिजेत. हल्लीच्या आपल्या शिकलेल्या मुलींपैकीं पुष्कळांचें वाचणें निव्वळ बूक पुरे करण्यापुरतें असतें. तसेंच आपल्यांतील मध्यम कुटुंबांतील पुष्कळ घरांमध्यें सुद्धां घरांत लहानशी लायब्ररी ठेवण्याची चाल नाहीं. त्यामुळें मुलींना हवी तशीं बुकें चटकन मिळत नाहींत. आणि मग त्यांची आवड मिळेल तें पुस्तक वाचण्याकडे जाते व त्या तीं पुस्तकें लोकांचीं देऊन टाकण्याच्या तगाद्यानें कोणीकडून संपवून काढतात. त्यापेक्षां दरएक कुटुंबांत आपल्या शक्तीप्रमाणें कांहीं चांगलीं पुस्तकें घेऊन ठेवण्याचा परिपाठ पडेल तर साहजिकच मुली रिकामपणाच्यावेळीं त्यापैकीं पुस्तकें वाचतील तेव्हां अशा प्रकारची सुधारणा आपल्याला करतां येण्याजोगीं आहे त्याचा विचार व्हावा. तसेंच आपल्यामध्यें कांहीं जुन्या व अंध परंपरेच्या रूढी आहेत. आपल्यामध्यें कांहीं

रूढी चांगल्या असून मोठ्या खुबीनें ठेवलेल्या आहेत. तरी पण कांहीं रूढींचें स्वरूप जें भलतीकडे गेलें आहे, तें तपासून त्यांतील निरुपयोगीं भाग गाळण्याला आपण शिकलें पाहिजे. ह्यांतील पुष्कळ गोष्टी निवळ बायकांना स्वतःच्या जोरावर करतां येतील. कारणपरत्वें एकमेकांच्या येथें जेवावयास जाणें अथवा कार्यांतलें जेवण ह्यांतील वेळेचा नियमितपणा पुष्कळसा आपणा बायकांनां राखतां येण्याजोगा आहे. पण घरांतील संध्याकाळची भाजी चिरून भांडी विसळून ठेऊन जाण्याची आमची संवय आह्माला सोडवत नाहीं. त्यामुळें पुरुष जरी १२ ला जेवले तरी आह्माला २ होतात. पण तेथें निरूपाय आहे. कारण दरएक जण असें ह्मणते कीं, बायका काय लवकर यायच्या आहेत मग आपणच कशाला जा, वेळ मोडायला. पण ह्या गोष्टीला आतां कांहीं तरी आळा घातला पाहिजे. आरंभाला कांहीं जणींनीं एकत्र विचार करून वाट पाहाण्याची कमाल मर्यादा ठरविली पाहिजे व मग सर्वांनीं जेवावयाचें, व उशीरा येणारणीनें रुसूं नये असा ठराव केला पाहिजे. तसेच स्वच्छतेसंबंधीं सुधारणा बायकांना स्वतःच्या हातून करतां येण्याजोगी आहे घरांतील व घराच्या आसपासची जागा स्वच्छ असणें किती महत्वाचें आहे ह्याची आतां प्लेगपासून पुष्कळांनां कल्पना झालेलीच असेल. कारण घर मोकळें टाकून आपण कांहीं दिवस बाहेर जाऊन राहिलें ह्मणजे घर रोगमुक्त होतें. तेव्हां त्यांत होता होईसतों रोगाला शिरकाव करावयास जागा न ठेवणें हें विशेष चांगलें नाहीं का? घराला उजेडाची

अतिशय अवश्यकता असते. तेव्हां घरांत काळोख असल्यास शक्य त्या रीतीनें त्यांत उजेड करावयाची तजवीज आधीं केली पाहिजे. तसेंच घरांतील केर घाण वगैरे गडी मोलकरणी कोठें टाकतात त्यावर थोडें लक्ष ठेवलें पाहिजे. मुलाबाळांना उंची कपड्यालत्यांनीं भूषविण्यापेक्षां त्यांच्या रोजच्या कपड्याच्या स्वच्छतेकडे जास्त लक्ष ठेवलें पाहिजे. पुष्कळ ठिकाणीं ह्याकडे दुर्लक्ष करण्यांत येते व पुष्कळवेळां त्याला गरीबीची अगर वेळेची सबब लावण्यांत येते. पण ह्या दोन्ही सबबी व्यर्थ आहेत. आपल्याला खरी स्वच्छतेची गोडी लागल्या नंतर कपड्याच्या स्वच्छतेकरितां लागणाऱ्या साबू वगैरेचा पैसा आपल्याला कोठेंही काटकसर करून काढतां येतो. तसेंच एखाद्या श्रीमंताची बायकोसुद्धां मोलकरीण गडी नाहीं ह्मणून किंवा ते नीट कपडे धूत नाहींत ह्मणून आपल्या मुलांच्या आंगांत घाणेरडे कपडे राहुं देते. परंतु तसे होऊं देऊं नये तसेंच घरांतील अडगळ किंवा कोठीच्या खोल्या वगैरे शक्य तितक्या स्वच्छ ठेवायला आपण शिकले पाहिजे. अलीकडे बाह्य टापटीपीची संवय फार बळावत चालली आहे पण त्याच्या बरोबरही आंतली टापटीप साधली पाहिजे. येणाऱ्या जाणाऱ्याला सकृतदर्शनी मनांत भरण्याजोगे जरी तुह्माला आपलें घर ठेवतां आलें नाहीं तरी हरकत नाहीं. पण त्याच्या आंत कोठेंही घाण ठेऊं नका. ह्या बाबतींत पुष्कळ वृद्ध माणसांचा कित्ता घेण्याजोगा आहे. पूर्वीच्या आणि आतांच्या

राहाणीमध्यें पुष्कळ अंतर पडलें आहे. त्यामुळें आतां आपल्याला आपल्या राहणीमध्यें सुद्धां बदल केला पाहिजे. पूर्वी थोड्या भाड्याला बरीच जागा मिळत असे पण दिवसेंदिवस भाड्याचे दर वाढत आहेत आणि त्यामुळें आतां जागाही आकुंचन पावत आहेत. तेव्हां आतां पूर्वीसारखें अडगळीच्या वगैरे खोल्या भरून किंवा सटर फटर सामान सांठवून ठेवण्याची आपली संवय आपण बदलली पाहिजे. तसेंच मुलांचे प्राथमिक शिक्षण आपणा स्त्रीयांनांच हातीं घेण्याजोगें आहे पण त्यांनां तें नीट आणि सांगोपांग देण्याकरितां आपल्याला स्वतःला शिक्षण मिळविलें पाहिजे. किंबहुना तीं शाळेंत जरी गेलीं तरी तेथें तीं काय करतात हें आपल्याला समजून घेतां आलें पाहिजे. अशा तऱ्हेच्या दरेक गोष्टीमध्यें आपण लक्ष घालूं लागलों कीं पुरुषांनां त्यांत आपोआपच लक्ष घालावें लागेल आपण आपली कामगिरी बजवावयास तयार झालों ह्मणजे आपल्याला त्यांनां असें विचारावयाचा हक्क येईल कीं, हा पहा आह्मी इतक्या गोष्टी करून तयार आहों. आतां तुमची प्रगती कां थांबली आणि अशा तऱ्हेनें आह्मी विचारावयास पुढें झालों कीं त्यांनां आपलें औदासिन्य टाकून उठावेंच लागेल. तसें उठायला आपण त्यांना भाग पाडलें पाहिजे. त्याकरितां जें जें ह्मणून आपल्या हातीं आहे. तें तें आपण केलें पाहिजे. बाकीच्या सर्व विषयाचें शिक्षण जरी मुलांना शाळेंत मिळालें तरी धार्मिक विषयाचें शिक्षण व नीति शिक्षण हें त्यांना घरीच मिळालें पाहिजे व त्याकरितां स्वतः आपण धार्मिक गोष्टींचा

नीति विषयक गोष्टींचा आधीं अभ्यास केला पाहिजे. कारण मुलांनां हें वळण मुख्यतः मातेकडूनच मिळत असतें. आपण विचारानें पाहा ह्मणजे आपल्याला असें दिसून येईल कीं प्रथमच्या मुलांपेक्षां शेवटचें बहुधा फार प्रेमळ व धार्मिष्ट असतें. ह्याला कांहीं ठिकाणीं अपवाद असेल. असें होण्याचें कारण हें कीं मनुष्यांमध्यें जरी तरूणपणीं नास्तिकपणा असला तरी वयाच्या वाढीबरोबर त्याचे विचार गंभीर स्वरूपाचे बनून त्याला हळुहळू ईश्वर विषयक गोष्टीची गोडी लागून तो आपआपल्या मताप्रमाणें त्याचा जास्त विचार करावयास लागतो. व त्याच्या मनांत ईश्वराचे अस्तित्व, सात्विक गुणाची वाढ, खऱ्या खोट्याची चाड, प्रेमलता, वाईटाचा तिटकारा, भूतदया वगैरे गूण वाढत जातात आणि वयाच्या वाढीबरोबर स्त्रियांची वत्सलताही वाढते. त्याचा परिणाम तिच्या दिवसभर संगतींत असणाऱ्या लहान मुलांच्या मनावर होतो आणि हे गुण एकदां लहानपणीं स्वभावांत दृढ झाले ह्मणजे मग तें मूल जरी मोठेपणीं निरनिराळ्या परिस्थितीशीं झगडलें तरी त्याला नीती विषयक गोष्टींची आवड राहून तें इतर गोष्टी करतांनां त्या चांगल्या आहेत कीं नाहीं हें बरेच वेळां पाहिल. आपण कोणच्याही धर्माच्या मताचे अगर पंथाचे असूं द्या पण आपल्याला आपल्या धर्मांतील मूलतत्वाबद्दल व ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल श्रद्धा पाहिजे व त्या दृष्टीनें आपण आपल्या धर्माचा विचार करीत राहिलें पाहिजे. व आपण आपल्या धार्मिक समजुती प्रमाणें वागत चाललें पाहिजे. एवढ्यानेंच धार्मिक बाबतींत

आपली मोठीशी उन्नति होईल असें नाहीं. तरी पण आपण अधोगतींतून खाल बचूं व तेवढें झालें तरी सध्या आपल्याला बस आहे. अशा तऱ्हेनें आपल्याला करतां येण्या जोग्या ज्या ज्या गोष्टी आहेत असें मला वाटलें त्या त्या मी आपल्या पुढें मांडल्या आहेत. ह्यांतील पुष्कळ गोष्टी येथें जमलेल्या आपणा पुष्कळांच्या आंगांत असतील व कांहीं बद्दल आपला मतभेदही असेल पण ह्यांतील ज्या आपल्याला योग्य वाटतील व ज्या आपल्या जवळ नसतील त्या आपण एकमेकीपासून घेण्याचा प्रयत्न करूं या. ज्याबद्दल आपला मतभेद असेल त्या सोडून त्याहून दुसरा जो सर्वसंमत असा मार्ग असेल तो आपण पुढें मांडूं या. सारांश ज्या रीतीनें आपल्याला पुढें जातां येईल, आपली उन्नती करतां येईल व दुसऱ्या राष्ट्राच्या तोडीचे होतां येईल तो मार्ग काढून आपण पुढें जाऊं या. ह्यांत आपल्याला सद्हेतुपूर्वकच एकमेकींची स्पर्धा करावयाची आहे. त्यांत मत्सराचें वारें तो परमात्मा न आणो अशी मीं प्रार्थना करतें.



## ६ लग्नांतील मानापमान व रुसवे फुगवे.



इतर देशांकडे पाहतांना आपल्या देशाची अवनति झालेली दिसते आणि ती अवनती कां झाली आहे याचा विचार करितांना सामाजिक सुधारणेचा प्रश्न आपल्यापुढें उभा रहातो. पण सर्वांत वाईट गोष्ट हीच आहे कीं, ह्या गोष्टीचें आह्माला मुळींच महत्व वाटत नाहीं आमच्या देशामध्यें शिक्षणाचीं साधनें उपलब्ध झाल्यापासून जितकीं वर्षे झालीं त्या वर्षांच्या मानानें आह्मी जितकें करावयास पाहिजे तितकें कांहींच केलें नाहीं, असे मोठ्या कष्टानें ह्मणावें लागतें. काळाच्या ओघावर ज्या कांहीं गोष्टी यदृच्छेनें घडत आल्या तेवढेंच. पण अलीकडे समाजाचें लक्ष उन्नतिकडे वेधलें आहे. आनंदाची गोष्ट ही कीं, अशा प्रकारच्या सुधारणेमध्यें बायकांनां काय करतां येईल याचा विचार करण्याकरितां स्त्रिया स्वतः एकत्र जमूं लागल्या आहेत. हें भावी देशोन्नतीचें चिन्ह होय.

समाज सुधारणेचा प्रश्न फार बिकट आहे आणि तो कशा प्रकारें सोडवितां येईल त्याबद्दल कांहीं काळपर्यंत तरी मतभेद असणारच. तरीपण कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्याबद्दल बहुतेक सर्वांची एकवाक्यता असते. अशाच प्रकारच्या समाजांतील कांहीं रूढींच्या प्रश्नांची चर्चा करून त्यांचा निषेध करण्याकरितां

सभा भरत आहेत त्यामध्यें ज्या कांहीं सुधारणांबद्दल चर्चा होते त्यांपैकीं लग्नांतील रुसव्यांफुगव्यांसंबंधानें व मानापमानासंबंधीं विचार करण्याचें मीं योजिलें आहे. लग्न या शब्दाचा खरा अर्थ आह्मी हल्ली विसरत चाललों आहों. ज्याप्रमाणें आह्मीं मुलांना लहानाचीं मोठीं करितों, त्यांना सुख कसें होईल यासंबंधाची काळजी वाहतों; त्यांचें पुढील आयुष्य त्यांना सुखकर होण्याकरितां त्यांच्या शिक्षणाची काळजी घेतों, त्याचप्रमाणें त्यांनां जन्माचा उत्तम सोबती मिळवून देणें आणि आपल्यासारखीच काळजी घेणारी व त्यांवर प्रेम करणारी माणसें मिळवून देणें हें आपलें काम आहे. लग्नामध्यें दोन निरनिराळे जीव एक होत असतात व त्या दोन जीवांच्या सुखाकरितां व आनंदाकरितां दोन कुटुंबेंही एकरूप होतात आणि त्यांच्यामध्यें खरें प्रेमाचें व स्नेहाचें नातें सुरू होतें असो. मुलाची परीक्षा उतरल्यानें जसा आनंद आईबापांना होतो तसाच आनंद मुलीच्यामुळें सासूसासऱ्यांना होतो. पण या आनंदाचा उपभोग प्रेमाच्या अभावीं दोघांना घेतां येत नाहीं. याचीं कारणें पाहूं गेल्यास इतकीं क्षुद्र असतात कीं, आपले आपल्यासच हसूं येते. बहुतेक लग्नांतून हुंडापांडा, मानअपमान वगैरेच्या यादी आधींच तयार झालेल्या असल्या तरीही मजा अशी असते कीं, भांडणें हीं होतातच; व याचें कारण पाहूं गेल्यास असें आढळतें कीं, कोठें तोंडधुण्याची तयारी नीट नाहीं तर अंबोणांत भाजीचीं डेखें नाहींत; वेणीची फणी लहान तर पायधुण्याच्या तस्ताला घांटच नाहीं; ओल्या खोब-

त्याच्या तुकड्यानींच भरल्या व ते तुकडेही भिकाऱ्यासारखे ! मोलकरणीला नारळाचा मानच नाहीं तर अत्तराला वासच नाहीं. अशा क्षुल्लक गोष्टीवरून जो तो आपल्या अकलेचें व मानाच्या हलकटपणाचें प्रदर्शन करीत असतो. खरें पाहुं गेलें असतां दोन्ही कडच्या माणसांनीं कानाडोळा करण्याजोग्या ह्या गोष्टी असतात. मुलाकडच्या बायकांनीं नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपण ज्या ओट्या वगैरे मान ह्मणून घेतों, त्या आपल्या घरांत नारळ नसतात ह्मणून घेत नाहीं. पण हा फक्त मान आहे. मग त्याचा एवढा अट्टहास कां ? बरें ! तसेंच मुलीकडच्या माणसांनीं तरी एवढें मोठें लग्न करावयाला उभे राहिल्यावर मग २ खोबऱ्याच्या वाट्यांत, ४ नारळांत व भिकाऱ्याला शोभण्यासारख्या खोबऱ्याच्या तुकड्याकरितां येवढी काटकसर कां ? आपण एवढी मुलगी देतों मग त्या मुलीच्या सुखाकरितां आपल्याला एक वीस पंचवीस रुपये जास्त खर्च करून जर नारळांनीं आणि वाट्यांनीं त्यांना खूष करितां येत असेल तर तसें कां न करावें ? तसेंच कोठें एखादा जास्त नमस्कार, कोठें चांदीचें ताट जेवावयास ठेवणें, कोठें सावकाश या शद्बांनीं विहिणीची आराधना करणें, मसाल्यांत घालून ज्या लवंगाचा नास होतो त्यांतील कांहीं लवंगा, व चहाच्या साखरेंतील थोडीशी साखर आंचवावयास देण्यानें जर विहिणींनां आपला मान झाल्यासारखा वाटतो तर तो कां न करावा ? उलटपक्षीं मुलांच्या माणसासंबंधानेंही तसेंच आहे. विहिणींच्या इथल्या चांदीच्या ताटांत जेवण्यानें अगर पेलाभर

चहानें आपलें जन्माचें सार्थक कांहीं व्हावयाचें नाहीं. ह्या स्नेहसंबंधानें व सुशील आणि सद्गुणी सुनेच्या सहवासानें आपल्या मुलाचा जन्म आनंदांत जावयाचा असतो. पण ह्या गोष्टी लक्षांत न घेतां आह्मीं लग्न लागल्यापासून तें संपेपर्यंत नसत्या कुरकुरी काढून भांडण्याला सुरुवात करतों आणि हीं भांडणें कधीं कधीं विहिणीविहिणींच्या आयुष्यापर्यंतही पुरतात. किती ही शोचनीय स्थिती! बरें ह्या कुरकुरी तरी काय? तर कोठें नाकांत घालावयाचें सुंकलें लहान, मोती बारीक, कान लांब, नाक आंखूड, डोळे पिचके, पायाला ६ बोटें अशा प्रकारच्या असतात. पण खरें पाहिलें तर मजा अशी असते कीं, लग्नाच्या-पूर्वीं घरांतील नायकापुरुष मिळून ४।५ जणांनीं तरी मुलगी पाहिलेली असते मग ही कुरकुर कां? बरें, जरी बोलणारांनीं पाहिली नसली तरी तीं ज्या माणसांवर विश्वास ठेवतात त्या माणसांचा बोज सांभाळण्याकरितां तरी त्यांनीं गप्प बसावयास हवे. नाहींतर ज्यांना चांगली परीक्षा करतां येत असते त्यांनीं स्वतः जाऊन तरी मुलगी पाहून यावें. याला हल्लींच्या काळांत कोणी अडकाठी करणार नाहीं. कारण हल्लींच्या स्थितींत आमच्या मुली ह्मणजे गिऱ्हाइकाच्या पसंतीकरितां ठेवलेला मालच आहे. मात्र अंतर इतका असतो कीं, दुकानांतील माल गिऱ्हाइ-काला पैसे देऊन घ्यावा लागतो. आणि ह्याला आह्मीं वर दक्षिणा देऊन देतो. तेव्हां ज्याला ज्याला ह्मणून मुलगी पहावयाची असेल त्यांनीं त्यांनीं ती बघून घ्यावी; आणि तसें करण्यास फावलें

नाहीं तर मागून मुलीच्या मांडवांत जाऊन त्या मुलीच्या देखत व तिच्या आप्तांच्या देखत कुरकूर करीत बसण्यापेक्षां गप्प बसलेलें बरें. तसें करण्यानें मुलीच्या मनांत श्रीगणेशायनमः पासूनच सासरच्या माणसांविषयीं अनादर उत्पन्न होतो. आणि ज्या घरच्या माणसांनां मी आज आवडत नाहीं त्या घरीं पुढें माझें कसें होईल अशी धास्ती उत्पन्न होते. इतकेंहीकरून झालेली गोष्ट मोडण्याजोगीं असते असेंही नाहीं. मग विनाकारण एकमेकांकडे वाईटपणा घेण्यांत काय अर्थ? बरें! आज आपण वाईटपणा घेतला तरी उद्यां मुलगा आणि सून एक व्हावयाचीच. आणि कांहीं दिवस तरी मुलगा आपल्या बरोबर सासुरवाडच्यांनां वाईट ह्मणत असला तरी पुढें तो त्यांच्याशी सरळ होणारच. मग त्याच्या दृष्टीनें सुद्धां आपली योग्यता थोडीशी कमी ठरणार. ह्मणजे विहिणीवर वर्चस्व चालविण्याच्या आवडींत, सुनेला ताब्यांत ठेवण्याच्या महत्वाकांक्षेंत आपण मुलाची सुद्धां आपल्या ठिकाणीं असणारी पूज्यबुद्धी आदर आणि प्रेम, आपण घालवून बसतों त्यामुळें शेवटीं हाय गेलें हुय गेलें धुपाटणें हातीं आलें असें होतें. तेव्हां या बाबतींत आधीं सुधारणा झाली पाहिजे. ही करणें आपल्या बायकांच्या हातीं असतें. पण तें न होतां आरंभापासून धुमसत असलेला राग, हातांत आलेला विहिणपणा जेवावयाला उशीर करण्यांत आह्मीं गाजवून घेतों. पण त्यामुळें इतर माणसांनां किती त्रास होतो याची आह्मांला कल्पनाही होत नाहीं. बरें कल्पना नाहीं ह्मणावी तर आमच्यापैकीं बऱ्याच

जणी बऱ्याच वेळां मुलींच्या आया झालेल्या असतात पण हातीं आलेल्या लहानशा अधिकाराच्या वेळीं त्यांचें त्यांना विस्मरण होतें ह्मणून आतां या गोष्टींत लवकर सुधारणा झाली पाहिजे. ज्याप्रमाणें हुंड्याची, दागिन्याची, मानापानाची व जेवणावळीची यादी तयार होते त्याप्रमाणें जेवणें किती वाजतां व्हावयाचीं, व किती बोलावणीं घेऊन विहिणींनीं जेवावयाला जावयाचें याचा ठराव करावा. ह्मणजे मुलीकडच्यांनां बोलावण्यांची माळका भराभरा उरकून घेऊन स्वस्थ बसावयाला सांपडेल व लवकर जेवणें झालीं ह्मणजे मागची निरवानिरव करून ह्मातान्या आजीबाईनां आडवें व्हावयाला मिळेल, व लहान मुलीची विहिणींच्या पंक्तीला बसण्याबद्दल निराशा होणार नाहीं. शिवाय विहिणींच्या तोंडांत ऊन अन्न पडेल.

तशाच आणखी सुधारणा करण्याजोग्या गोष्टी ह्मणजे लग्नांतील समारंभ. हल्लीं दिवसेंदिवस वधूवरांचीं वयें वाढत आहेत. अशावेळीं पूर्वींच्या लहान मुलांच्या लग्नांतील चाली यत्किंचितही फेरफार न करितां त्या तशाच चालू देणें हा शहाणपणा नाहीं. जेव्हां ६।७ वर्षांची मुलगी व १२।१३ वर्षांचा मुलगा असतो तेव्हां लाजेची भावना, चांगल्या वाईटाची किंमत, सारासार विचारशक्ती मुलांमध्यें मुळींच नसते. त्यावेळीं हे विधी तीं मोकळ्या मनानें करतात. व त्यामुळें इतरांनां करमणूक होते. पण वयाच्या वाढी-बरोबर मनुष्याची विचारशक्ती वाढते. ज्ञानामृताचा घोट त्यांना

न्यावयाला सांपडतो. त्यामुळें त्यांची कल्पनाशक्तीही वाढत जाते, व आपल्यामधील रूढींचा चांगला वाईट परिणाम त्यांनां कळतो. त्यामुळें विड्या तोडणें, घांस देणें, मांडीवर घेणें, लपंडाव खेळणें, चुळा थुंकणें, इत्यादि पूर्वीचे काळीं आवश्यक वाटणारे विधी मुलांनां आवडत नाहींत. ह्यामुळें वडील माणसांत व त्यांच्यांत बेबनाव होऊन दोघेंही नाखूष होतात. तेव्हां आतां काळाच्या-मानानें पूर्वी आवश्यक वाटणाऱ्या पण आतां निरर्थक ठरलेल्या गोष्टी, ह्या रूढी, ह्या चाली रीती, आह्मांस सोडून दिल्या पाहिजेत. ह्या सुधारणांमध्यें सर्व अधिकार आह्मां बायकांच्या हातांत असतात, व ही सुधारणा करण्यांत कोणचेही पुरुष आडकाठी करणार नाहींत. तेव्हां ह्या गोष्टींनां अजिबात फाटा मिळाला पाहिजे. शिवाय आणखी एक वाईट चाल आमच्यांत थोड्या फार प्रमाणांत आहे. ती ह्मणजे लग्नांतील चोऱ्या! यांचा आरंभ केर काढण्याच्या केरसुणीपासून. त्या कोठवर न्यावयाच्या हें विहिणींच्या मर्जीवर असतें. बऱ्याचवेळीं दोघांच्या भांडणांत तिसऱ्याचा लाभ होतो. कारण विहिणींनीं चोरलेले जिन्नस परत आणतां येत नाहींत व किती चोरले ह्याची यादी मागतां येत नाहीं. त्यामुळें हरवतील तितके विहिणींच्या नांवावर खपतात. अशावेळीं खरी चोरी करणारांनां चांगलेच फावतें. शिवाय विहिणींनां चोर ह्मणावयाची सोय नाहीं. अशा रीतीच्या निरनिराळ्या जातींमध्यें पुष्कळ गोष्टी कमी जास्त प्रमाणावर सुरू असतात. दरेकाचा उल्लेख करणें अवघड जाईल. पण

साधारण भांडणांचें मूळ घरांतल्या ओट्या, शेजारपाजारणींच्या मोलकरणी गोळा करून त्यांच्या ओट्या भरविणें, जेवणास उशीर, आंबोणाबद्दल रुसणें वगैरे मध्यें असतें. पण आतां या सुधारणेच्या काळांत या वेड्यावांकड्या गोष्टी, हीं क्षुल्लक भांडणें, जन्माचें वांकडेपण सोडून देऊन स्नेहसंबंध वाढवावयाच्या कांहीं निरनिराळ्या तऱ्हा शोधून काढिल्या पाहिजेत. आणि आपला कौटुंबिक स्नेह वाढवून सर्वांच्या मदतीनें आपण समाजकार्य करण्यास पुढें आलें पाहिजे. ह्मणजे आपल्या हातून केवढी समाज-सुधारणा होईल बरें? ती करण्याकरितां आपणास आपला यत्किंचितही वेळ मोडावयाचें कारण नाहीं. घरांत बसल्या बसल्या आपलीं रोजचीं कामें करीत असतां आपल्याला समाज सुधारणेचें श्रेय मिळेल व आपल्या भावी उन्नतीला आपण हातभार लावि-ल्यासारखें होईल. तरी भगिनींनों, उठा आणि समाज सुधारणे-बद्दल आपला आळस टाका. लग्नांतील मानापमानांसारख्या गोष्टींत आपल्या बुद्धीचा व्यय न करितां, परकीयांची स्थिती तपास-ण्याकडे, त्यांच्या चांगल्या चालीरितींचें निरीक्षण करण्यांत, आपल्या अज्ञ भगिनींचें निरीक्षण करण्यांत, आपल्या अज्ञ भगिनींना उपदेश करण्यांत तिचा सद्व्यय करा. आणि आपणां बायकांच्या हातांत असेल तेवढी सुधारणा करून बंधुवर्गाला सामाजिक सुधारणेंत मदत करावयाला पुढें या अशी आपल्याला सविनय विनंती करून मी हा लेख पुरा करते.



# ७ सामाजिक तडजोड.



## नाशिक येथें सौ. गिरजाबाई केळकर यांचें झालेलें व्याख्यान.



श्री. रा. प्रधान यांनीं मला व्याख्यान देण्यास बोलाविलें. तेव्हां काय बोलावें या विचारांत मी असतांना एका व्याख्यानमालेच्या नियमांच्या कागदाकडे माझें लक्ष गेलें. त्यांत असें होतें कीं, वक्त्यानें आपल्या भाषणाची एक लेखी प्रत संस्थेला द्यावी. हा नियम वाचून मला नवल वाटलें कीं, जुन्या शाळांतून घोकंपट्टी होते ह्मणून त्यांना नांवें ठेवावयाचीं आणि खुद्द नव्या मंडळीनें स्थापन केलेल्या संस्थानांतून अप्रत्यक्षरीत्या घोकंपट्टी ठेवावयाची. पण विचार करितां मला असें दिसून आलें कीं, ह्यांत त्यांचा हेतु स्तुत्य आहे. कारण ज्यांना व्याख्यानाला हजर राहतां येत नाहीं, त्यांना त्याचा लाभ मिळावा ह्मणून तसा नियम केलेला आहे. या हेतुबद्दल मतभेद असणें शक्य नाहीं. तेव्हां माणसाचा हेतु नेहमीं पाहिला पाहिजे. असेंच जगांतील प्रत्येक व्यवहाराचें आहे. उदाहरणार्थ, आपली राजकीय चळवळच घ्या. यांतील जहाल नेमस्त पक्ष एकमेकांना किती नांवें ठेवितात ? दोघांचा हेतु एक, पण साधनांबद्दल भांडण. केव्हांही पाहिलें तर ज्याप्रमाणें लहान

संसाराला दोन शक्ती लागतात तशाच मोठ्या संसाराला लागतात. नवरा बायको दोघेंहि तापट असलीं तर संसार कधींच धुळीला मिळेल. पण तसें दोघें थंडही उपयोगाचीं नाहींत. नाहींतर मुलें बाळें, नोकर चाकर आप्त स्वकीय यांच्यावर दाब चालायचा नाहीं. एक पुढें ओढणारें व एक मागें ओढणारें नेहमीं पाहिजे ह्मणजे मनुष्य थोडें पुढें जातें. दुसऱ्यामुळें तापट मनुष्य उडी घालतांना शांतपणानें विचार करितें. पण याला कारण मात्र नवराबायकोचें परस्पर प्रेम व आदर असतो. दोघें एकमेकांना नांवें ठेवितात. एक दुसऱ्याला उताविळ ह्मणतें व दुसरें त्याला थंड ह्मणतें. आणि एकमेकांना खूप ठेवण्याकरितां उतावीळ मनुष्य थोडे थंड व्हावयाचा प्रयत्न करतें व थंड मनुष्य अंगांत जरा जास्त उष्णता आणण्याचा प्रयत्न करतें यामुळें संसार सुखाचा होतो. निगेटिव्ह व पॉझिटिव्ह या दोन शक्ती एकत्र झाल्याशिवाय वीज उत्पन्न होत नाहीं. अशीच स्थिती राष्ट्राच्या संसाराची आहे. तेथेंहि जहाल व नेमस्त ह्मणजे उत्साही व शांत विचाराचीं माणसें पाहिजेत ह्मणजे राष्ट्राचा संसारहि बरोबर मध्यावर चालेल. पण दोन्ही पक्षांत एकमेकांबद्दल नवराबायकोप्रमाणें आदर, पूज्यबुद्धि व प्रेमभाव पाहिजे. देवाण घेवाण पाहिजे. एकमेकांचें प्रेम मिळविण्याला एकमेकांनीं थोडेसें आपलें सोडावयास पाहिजे. सारांश, दोन्ही पाहिजेत व बघणाऱ्यांनीं त्यांचे हेतु पाहिले पाहिजेत आणि ते न बघितल्यामुळेंच आपण दुसऱ्याला दोष द्यायला तयार होतों. फार कशाला, जहाल मंडळी भलत्या उड्या

घालते व अपरिपक्व मनाच्या तरुणांवर त्याचा भलता परिणाम होतो, असें ह्मणणारी नेमस्त मंडळी जेव्हां सामाजिक बाबतींत जहाल होतात तेव्हां प्रेक्षकांनां कशी गम्मत वाटते. त्यांचा हेतु चांगला असतो. सामाजिक सुधारणेबद्दलची त्यांची आस्था व कळकळ पाहिली ह्मणजे त्यांच्याबद्दल आपल्याला किती आदर व पूज्यबुद्धी वाटते ? पण त्यावेळेस त्यांचेंच वाक्य आपल्या डोळ्यांसमोर उभें राहतें कीं, आपण सामाजिक सुधारणेसंबंधानें बोलतों, सांगतों किंवा करतों तेव्हां कोवळ्या व अपरिपक्व तरुणांच्या मनावर याचा काय परिणाम होत असेल ? आपली धर्मपत्नी बरोबर घेऊन सभेला अगर फिरायला जाणें ह्यांत खरोखर चूक अगर पाप नाहीं, तरी सुद्धां या एवढ्याशा क्षुल्लक सुधारणेनें लहानपणापासून प्रेमानें लालन पालन केलेल्या आईबापांची किंवा आप्तांची मर्जी दुखावत असल्यास तसें न करितां दुसऱ्याचें मन न दुखावतां होईल तेवढी सुधारणा करावी, हें तत्व तरुण पिढीच्या लक्षांत रहात नाहीं; तर सुधारणा करितांनां थोडासा लोकापवाद सहन केला पाहिजे, थोडासा स्वार्थत्याग पाहिजे ह्मणून हे वीर मन मानेल तसे वागतात व त्याला उदाहरण ह्मणून सन्माननीय व सुधारणावादी थोर मंडळीकडे बोट दाखवितात. खरेंच, हे वीर केवढा स्वार्थत्याग करितात ? केवढें हें मनोधैर्य ? पण सारासार विचार करावयाची व्यावहारिक दृष्टी परिक्षेच्या डिग्र्यांनीं किंवा कोरड्या पुस्तकी ज्ञानानें त्यांनां प्राप्त झालेली नसते. त्यामुळें

ते आपल्या फायद्यापुरते शब्द पकडतात. पण त्यांत दोघांचाहि हेतु चांगला असतो. तशीच गंमत इतर बाबतींत असते. कालचें चांगलें, आज वाईट ठरतें व आजचें चांगलें उद्यां वाईट ठरेल. तेव्हां तें संभाळून त्यांतल्यात्यांत होईल तेवढें काम करणारांनांच लोक मुत्सद्दी ह्मणतात. अशीच स्थिती आपल्या सामाजिक सुधारणांची आहे. पूर्वीं सुधारकांचें नांव ऐकलें ह्मणजे लोक तेथें सर्व अवगुणांचें माहेरघर कल्पीत. सुधारकांचें बायकांच्या दृष्टिनें असें चित्र होतें. वाटेल तें खावें, वाटेल तें प्यावें, देव नाहीं, धर्म नाहीं, विटाळ चांडाळ नाहीं. ज्यांच्या घरच्या बायकांनां बायकी गुणांची धर्माची चाड नाहीं, ते सुधारक. पण आतां ती समजूत पार बदलून गेली. आतां लोक त्यांच्यांत पुष्कळ चांगले गुण पाहुं लागले आहेत. निदान त्यांच्यांत अवगुण तरी नाहींत असें कबूल करूं लागले आहेत. तेव्हां सुधारणा हितेच्छूंनां काम करावयास पुष्कळ सोपें झालें आहे. कारण पूर्वीं एखाद्या चांगल्या व्यक्तिच्या मनांत जरी कांहीं चांगली कल्पना आली तरी त्यांनां ती कृतींत आणण्यास किती त्रास पडे, हें हरीभाऊ आपटे यांच्या 'मीं' कादंबरीवरून कोणालाही कळून येईल. पण आतां कार्य करावयास एवढें मोठें क्षेत्र आहे कीं, कार्य करणारीं माणसेंच खऱ्या उत्साहानें पुढें आलीं पाहिजेत. हल्लीं गंमत अशी आहे कीं, इच्छा पुष्कळांना आहे. त्यांत प्रत्यक्ष काम करणारीं अगदींच थोडीं. जर कोणी त्रयस्थानें कांहीं करावयास आरंभ केला तर तें आवडणारीं व मध्यें आडकाठी न घालणारीं अशीं बरींच व

अगदीं विरुद्ध अशीं चौथा हिस्सा माणसें आहेत. विरुद्ध माणसेंसुद्धां काळाच्या ओघाबरोबर बाकीच्यांनां येऊन भेटतील. पण ज्यांनां कांहीं खरोखर व्हावेंसें वाटतें त्यांनीं प्रत्यक्ष कृतीनें लोकांस बरोबर घेऊन काम करावयास लागलें पाहिजे. पण ह्या मंडळींत जितका उत्साह असतो तितकीच सहिष्णुता नसते. कारण जरा कोठें मतभेद झाला की, ते दुसऱ्याचें सहकारित्व सोडून द्यायला तयार होतात; व अशा प्रकारचे मतभेद व्हावयाला हिंदुस्थानांत तर पुष्कळच जागा आहे. जो देश आज सुधारणेच्या शिखरावर चढला आहे, जेथें स्पर्शास्पर्श ठाऊक सुद्धां नाहीं, जेथें खाण्यापिण्याला जातिभेद नाहीं, तेथें सुद्धां किती तरी पक्षभेद ऐकण्यांत येतात. मग हिंदुस्थान तर काय अनेक जाती, अनेक धर्म व अनेक पंथ यांचें माहेर घर. तेथें जर असल्या बाबींनां महत्त्व दिलें तर राष्ट्र कधींच वर येणार नाहीं. पण मला वाटतें असल्या बाबींनां महत्त्व देण्याची आज जरूरच नाहीं. जातिभेद हवा किंवा नको, सहभोजनें व्हावी किंवा नाहीं हें आपण ठरविण्यापेक्षां काळच ठरवील. काळाच्या ओघामध्यें जें सत्य असेल तेंच अखेर टिकेल आणि त्यासंबंधानें जर प्रयत्न करायची जरूरी वाटली तर तेवढे करा. त्याचा संबंध दुसऱ्या कामाशीं लावूं नका. मुंबई-पुण्यासारख्या ५–७ शहरांतून जातिभेद मोडणारीं कांहीं माणसें मिळालीं तरी त्या शिवायच्या लाखो खेड्यांतून अशा समजुतीचीं माणसें मिळणार नाहींत. पण अशा वादग्रस्त गोष्टींबद्दल कां होईना पण विचार करण्याकरितां त्यांना आधीं शिक्षण पाहिजे, आणि तें

सरऱ्हा देण्याचा प्रयत्न सुधारणा हितेच्छूंनीं केला पाहिजे. निदान ज्या ज्या गोष्टीपुरता मतभेद होणें शक्य नाहीं त्या त्या गोष्टी-पुरतें तरी आपण एकमेकांचें सहकारित्व पत्करा व बाकी गोष्टी संबंधानें मनाचा थोरपणा दाखवा. आपल्यापैकीं पुष्कळांनां ठाऊकच असेल कीं, बऱ्याच हिंदु कुटुंबांत अशी एक रूढी आहे कीं, वृद्ध बायका सुनेच्या हातचें ह्मणजे लहान बायकांच्या हातचें जेवीत नाहींत. आतां या बायकांनां जरी आपण कितीही सम-जुतीनें सांगितलें कीं, सून तुह्मी ह्मणाल तशा सोंवळ्यानें करून घालील, किंवा मुलानें जरी ह्मटलें कीं, सुनेंकडून तुला हवें तसें करून घालतों, तरी ती बाई तें ऐकणार नाहीं. व दुखण्याबाण्यांत 'आजपर्यंत नाहीं खाल्लें तर थोडक्याकरितां कशाला बाटूं' असें ह्मणून दूध, साबुदाणा वगैरे पदार्थ खाईल. तेव्हां अशा स्थितींत सुना किंवा लेकी तिला टाकून देतात कां? नाहीं. ही कल्पना सुद्धां त्यांच्या मनांत येत नाहीं. इतकेंच नव्हे तर जेव्हां ती स्वयंपाक करते तेव्हां तिचें काम तिला सोपें व्हावें ह्मणून दुरून जितकी मदत होण्याजोगी असते तितकी करण्याचा त्या प्रयत्न करितात. पण यांत राग न येण्याचें मुख्य कारण जाज्वल्य प्रेम व आदर होय. असाच आदर व प्रेम आपण एकमेकांबद्दल ठेवाल, तर जातिभेद किंवा मतभेद आपल्याला आडवा येणार नाहीं, व आपल्या हातून पुष्कळ कार्य होईल. पूर्वीं कार्य करा-वयास जागा नव्हती तेव्हां कार्य करण्याबद्दल आपण सुधारणेच्छु मंडळींनीं जितका उत्साह दाखविला, तितका आतां प्रत्यक्ष

कृतींत आणण्याचा प्रयत्न करा. आतां जनसमूह पूर्वी इतका सुधारणेच्या विरुद्ध नाहीं. कारण काळानें त्यांचीं मनें दगडासारखीं कठोर होतीं तीं बरींच मृदु केलीं आहेत. पूर्वी क्वचित्च कोठें सकेशा विधवा दृष्टीस पडे व ती सुद्धां वयानें लहानच असे. असें असून सुद्धां तिच्या आप्तांनां त्या संबंधानें लोकांकडून किती बोलणीं ऐकावीं लागत व तिला स्वतः तर लोक असें वागवीत कीं, तिला नको जन्म होई. पण या प्लेगोबाचा तडाखा इतका जबर बसला कीं, दरेकाला तो जाणवला. कोणाच्या घरांत, तर कोणाच्या आप्तांत, तर कोणाच्या शेजारीं पाजारीं, पण विधवा स्त्री आहेच. अशावेळीं अर्थात् लोकांचीं मनें कळवळूं लागलीं; त्यांचा बहिष्कार सैल पडला, व होतां होतां ती गोष्ट आतां इतकी आंगवळणीं पडली कीं, बाहेर जातांनां अगर रस्त्यांत अशा बायका भेटल्यास अपशकून होतो या रूढीचा मागमूसही नाहींसा झाला. जी गोष्ट हजारो लेक्चरांनीं किंवा व्याख्यानांनीं झाली नसती ती गोष्ट काळानें केली. ज्या गोष्टीचा विचार केला ह्मणजे कांहीं माणसांनां संताप वायु होत असे, ती गोष्ट आतां मुकाट्यानें ऐकून घेऊं लागले आहेत. सारांश, लोकांचीं मनें आतां बरींच तयार होत चाललीं आहेत. जमीन तयार होत आहे. ज्या जमिनींत जें पीक येईल तें पेरायचें काम शहाण्या शेतकऱ्याचें आहे. अमकें पीक येईल तेव्हांच पेरूं असें ह्मणूं नका. उद्योगाला लागा. क्षुल्लक मतभेद बाजूला ठेवून जेवढ्या बाबतींत एकमत होईल तेवढ्या बाबतीं पुरतें कार्य उरकून घ्या. मीं मद्राशीं

आपल्याला ह्मटलें कीं, आजचें वाईट उद्यां चांगलें ठरतें. अशी गोष्ट बऱ्याच बाबीसंबंधानें आहे. ह्या पेहेरावाचेंच पहाना. पूर्वी केंस ठेवलेला मनुष्य किती क्वचितच दिसे. पण आतां ही गोष्ट सहसा कोणाच्या लक्षांतही येत नाहीं. तसेंच आमच्या बायकांचा कानाशीं गोष्टी सांगणारा पदर, चापून चोपून विंचरलेले केंस हें पूर्वी नटण्या मुरडण्याचें लक्षण मानीत असत. पण आतां त्याच्या उलट स्थिती झाली आहे. गुडघ्यापर्यंत लोळणारा पदर, कामिटीचें काम बजावणारें ओंचे, पुरुषांच्या शर्टांनां मागें सारणारें मनगटा-पर्यंतचें पोलके, हवेशीं क्रीडा करणारे केंस, हेंच आतां साधे-पणाचें ह्मणा अगर नीटनेटकेपणाचें लक्षण ठरलें आहे. इतकेंच नव्हे तर प्रसिद्ध नाटक कंपनींतील उत्तम स्त्रीपार्टी हा पेहेराव आपल्यामध्यें आणण्याचा कसोशीनें प्रयत्न करीत असतात. कारण हल्लीं जनरुची इकडे आहे आणि त्याचें कोणाला कांहीं वाटत नाहीं. पूर्वी वेणी घालणारी बाई ब्राह्मणाची व अंबाडा घालणारी बाई शेणवी प्रभूची असें समजावयाची एक रूढी होती. व याच रूढीला अनुसरून मी एकदां शेणव्याची ठरलें होतें. पण आतां त्याचा मागमूसही सांपडत नाहीं. मी ज्यावेळेस खेड्या-गांवांतून गेलें, त्यावेळेस लोक जितकीं ह्या गोष्टीला नांवें ठेवीत तितकें आतां कांहीं उरलें नाहीं. तसेंच कपडेलत्ते. एककीं दोन, अशा किती तरी गोष्टी दाखवितां येतील. पण या गोष्टीबद्दल कधीं कोणाला कांहीं प्रयत्न करावा लागला नाहीं. या यादृच्छेनें घडत गेल्या. तेव्हां जगांत प्रगती दोन तऱ्हेची आहे. एक

आपल्या आपण होणारी व दुसरी प्रयत्नानें होणारी. एकहोण्याचा प्रयत्न केला कीं, दुसरी आपोआप होते. तेव्हां जी काळानें होणारी आहे व जिच्या शिवाय आपलें फारसें अडत नाहीं तिच्या पाठीस लागावयाचें सोडून जिच्या शिवाय आपलें आडतें तिच्या पाठीस लागूं या. आज हिंदुस्थान मलेरिआ तापासारख्या रोगानें पछाडला आहे, तेथें आळसासारखा चेंगट रोग घर करून बसला आहे. त्याला ज्यांनीं त्यांनीं आपापल्या परीनें प्रयत्न करून काढून टाकिला पाहिजे. वर्षा सव्वा वर्षाखालीं माझ्या घरांत सर्व मुलें आजारी पडलीं तेव्हां डॉक्टरनीं हा मलेरिआ आहे ह्मणून सांगितलें. पण मलेरियामध्यें स्थलांतर अगर आपली रहावयाची जागा त्या विरहीत करणें हे दोनच उपाय होत. पण लहान मुलेंबाळें घेऊन स्थलांतर करणें किती त्रासाचे, खर्चाचें व गैरसोईचें आहे, याची कल्पना पुष्कळांना असेलच. पण रोग हटावयाला घर व आसपासची हवा मलेरिया विरहित करणें साध्य होतें आणि त्या प्रयत्नाला आह्मीं लागलों. आमच्या घराच्या जवळ थोडी बाग असल्यामुळें त्रास होण्याचा संभव आहे. ह्मणून घराच्या चोहोंबाजूंला फिनाईल शिंपडणें, कपडे वरचेवर उन्हांत टाकणें, घरांतील दरेक जागा स्वच्छ ठेवण्याचा प्रयत्न करणें, खाण्यापिण्याच्या दरेक जिनसाबद्दल खबरदारी घेणें हे आमचे प्रयत्न चालले होते; डॉक्टरचे औषध व्यवस्थितपणें मिळतें कीं नाहीं याची देखरेख पुरुष मंडळी करीत होती, व आमच्या वृद्ध सासूबाई आपल्या समजुती प्रमाणें धार्मिक दैविक उपाय, जुन्या

तऱ्हेचे काढे वगैरे देत होत्या. आतां आह्मांला जरी नक्की ठाऊक होतें कीं, ताप जरी मुलांनां येतो आहे तरी तो मलेरिया आहे, तरी पण त्यांची समजूत घालून त्यांचें मन दुखवण्याचा प्रयत्न करावयाची इच्छा आह्माला झाली नाहीं. कारण आह्मीं त्यांना सांगितलें असतें तर त्या ह्मणाल्या असत्या, " तुह्मी तुमच्या इच्छेप्रमाणें औषधें देतां आहांना ? ब्राह्मणानें एखादी एकादशणी केली, त्यांत तुमचें काय गेलें ? " हें त्यांचें ह्मणणें खरें होतें. कारण त्यांत थोडाशा पैशाच्या खर्चाशिवाय कांहींच त्रास नव्हता. उलट त्या निमित्तानें परमेश्वराची आठवण तितकी जास्त होत होती. कारण मनुष्य प्रयत्नांनीं जरी कोणचीही गोष्ट होत असली तरी परमेश्वरी साहाय्याची आवश्यकता असतेच. असो. सारांश, ह्या सर्वांच्या प्रयत्नांनी तीन महिने घर करून राहिलेला मलेरिया तीन वारांत निघाला. पण ' मलेरियाला हेच उपाय योग्य आहेत; एकादशण्या सत्यनारायण असलें कांहीं करावयाचें नाहीं, ' ह्मणून आह्मी जर त्यांच्याशीं भांडलों असतों तर त्या ' सांभाळ तुझीं मुलें तूं. आमचे हे वेडगळ उपाय तुला नकोत ना ? आज दोन महिने तुह्मी डॉक्टरच्या बाटल्या पाजतां आहां. आणखी पाजा ' असें ह्मणून निघून गेल्या असत्या, व त्यांचा जो उपयोग आह्मांला झाला तो झाला नसता; वडील माणसांच्या अंतःकरणापासून केलेल्या कळकळीच्या सेवाचाकरीला आह्मी मुकलों असतों, व मुलांची जी काय उत्तम व्यवस्था होत होती आणि त्यामुळें मुलांचें दुखणें मागें हटायला जी बहुमोल मदत त्यांच्याकडून मला

मिळाली तिला मी अंतरलें असतें. त्यांचें प्रेम व त्यांची मदत ह्या करितां त्यांच्या विचारांनीं चालण्यांत आमचें कांहीं नुकसान किंवा कमीपणा आहे असें मला वाटत नाहीं. असेंच आपल्या राष्ट्ररूपी घराचें आहे. त्यांत अज्ञानरूपी मलेरियानें आपणाला पछाडलें आहे. ह्यावेळेस ज्याच्याकडून जितकी मदत मिळेल तितकी घेऊन आपण कार्याला लागा. त्यांत जातिभेद आडवा आणूं नका. समजा, एक ब्राह्मण, एक सारस्वत व एक मुसलमान अशीं तीन माणसें शिक्षण हितेच्छू आहेत. शिक्षणासंबंधानें कोणी प्रयत्न केल्यास ते तिघेही तनमनधन देऊन मदत करावयास तयार आहेत; पण ते सहभोजनहितेच्छु नाहींत. त्यांची परंपरागत चालत आलेल्या धर्मावर ह्मणा अगर रूढीवर ह्मणा श्रद्धा आहे. तर त्या तिघांच्या सहकारित्वानें एखादी शिक्षण संस्था उभारायची कां तिघांनीं एकमेक आपल्याकडे जेवींत नाहींत ह्मणून तीन दिशेला बसायचें? खरें ह्मणजे त्यांनीं जेवण खाण्याचा प्रश्न बाजूला ठेवून शक्य तितकी एकमेकांनां मदत करावयाची; व एकमेकांबद्दल प्रेम व आदर बाळगावयाचा. असें झालें तरच कांहीं कार्य होईल व तरच प्रेम उत्पन्न होईल. प्रेम उत्पन्न व्हायला 'समानशीले व्यसनेषु सख्यं' लागतें; आणि एक व्यसन असलें ह्मणजे प्रेम उत्पन्न होतें, व तेथें जातिभेदाचा प्रश्न मुद्दाम होऊन कधीं आडवा येत नाहीं. उदाहरणार्थ, आपण लहानपणीं जेव्हां शाळेंत जातों तेव्हां एका वर्गांतल्या मुलावर ह्मणा अगर मुलीवर ह्मणा आपलें किती प्रेम असतें? आपण एकमेकाशीं किती मोक-

ळेपणानें व प्रेमानें वागतों? तेथें जातिभेद, स्वच्छता वगैरे कांहीं आडवें येत नाहीं. कां तर लहानपणीं आपलें मन मोकळें असतें व त्यांत द्वैत विचार शिरलेले नसतात ह्मणून. पण मोठेपणीं आपण सुसंस्कृत झालेलों असतों. मग मनाचा थोरपणा आपल्याला कां ठेवतां येऊं नये? सगळ्यांत मोठा कोण असें जर मला कोणीं विचारिलें तर त्याला 'जो मनानें मोठा तो' असें मी उत्तर देईन. एखादा मनुष्य मोठा विद्वान् आहे, श्रीमान् आहे, पण तो मनाचा मोठा नसेल तर काय उपयोग? पण एक मनुष्य जर गरीब असून मनाचा मोठा आहे, तर त्याची जास्त किंमत आहे. तर आपण सर्वजण जेथें मतभेद येईल तेथें मनाचा मोठेपणा दाखवून दुसऱ्याशीं सहकारितेनें काम करावयास तयार व्हा. समजा, आपण एक पांच सात मित्रमंडळी मिळून बाहेरगांवीं गेलां आहां. तेथें गेल्यावर एखादें प्रेक्षणीय स्थळ आपल्याला पहावयाचें आहे. पण तें लांब असून आपल्यापैकीं चालणारा इसम एक आहे. तर आपण त्याला लांबच्या प्रवासाला बरोबर न्याल. पण जेव्हां गांवांत हिंडावयाचें असेल, तेव्हां बाकीच्यांनां बरोबर घ्याल. पण जो सर्वांत अशक्त आहे, ज्याला मुळींच चालवत नसेल, त्याला तुह्मी जेव्हां बंगल्याच्या आसपास हिंडाल त्यावेळीं बरोबर घ्याल ना? तो एकसारखा घरीं बसून कंटाळला असेल ह्मणून त्याच्या करितां तुह्मी आपला आर्धा पाऊणतास खर्च कराल ना? तसेंच आपण आपल्या राष्ट्राच्या प्रवासांत करा. जेथें आपलीं ध्येयें उच्च असतील तेथें तशाच उच्च ध्येयाच्या माणसाला बरोबर

घेऊन चला. पण ज्यांचे विचार मध्यम, आचार मध्यम अशा माणसाच्या मदतीनें त्यांना आवडतील अशा, झेंपतील अशा सुधारणा करावयास तयार व्हा व ज्यांच्या हातून कांहीं होण्या-जोगें नसेल त्यांची नुसती सहानुभूती मिळवून आपलें काम त्यांना दाखवा. त्यापासून किती तरी उपयोग होईल, व सर्वांत मोठा फायदा माझ्या भगिनींसंबंधानें होईल. कारण अजून त्यांच्यातला फार मोठा समूह अज्ञानी आहे. ज्या शहाण्या आहेत, त्यांच्यां-तलि सुद्धां पुष्कळांचे स्वभाव नैसर्गिक परावलंबी लते प्रमाणेंच आहेत. आपल्या घरांत आपला नवरा जें बोलतो, जें मत प्रतिपादितो, तेंच त्यांना खरें वाटतें. आपल्या आपण स्वतः विचार करून स्वतःचें स्वतंत्र मत बनविणाऱ्या स्त्रिया आपल्यामध्यें फारच थोड्या आहेत. अर्थात् आपण ज्याप्रमाणें वागाल त्याप्रमाणें माझ्या भगिनी वागतील. जहाल पतीची बायको जहालच असते, मवाळाची मवाळ असते. सुधारक पतीची बायको मात्र नेहमीं सुधारक नसते. कारण बाळपणापासून धर्मासंबंधानें तिच्यावर इतके दृढ संस्कार झालेले असतात कीं, तिला ते सोडवत नाहींत व कांहींची स्थिती अर्धवट होते. तेव्हां अशावेळीं जर आपण सहकारितेनें वागावयाला आरंभ केला तर आपल्या स्त्रियाही तसें करतील. हल्लीं गांवोगांव बायकांच्या करितां संस्था, क्लब, समाज निघत आहेत. अशा ठिकाणीं जास्त स्त्रिया एकत्र मिसळावयाला अगर जमायला स्त्रियांनीं मोठेपणाच पत्करला पाहिजे. दोन्ही पक्षांनीं थोडें थोडें पुढें यावें लागतें. अशा बाबतींत पुष्कळ स्त्रिया

मनाचा मोठेपणा दाखवावयला तयार होतात. एका गांवांत एक बऱ्याच वयाच्या पण धार्मिक वृत्तीनें रहाणाऱ्या बाई होत्या. त्या मोठ्या सज्जन असून सुस्वभावी होत्या. असें असून त्या गांवांतल्या स्त्रियांच्या समाजांत त्यांचें येणें जाणें नसे. मला तें पाहून आश्चर्य वाटलें कीं, अशा चांगल्या बाईंना या कां वगळतात? पुढें त्यांच्याकडे गेले व त्यांची समजूत करून ह्मणण्यापेक्षां तडजोड करून त्यांना आणल्या. त्या न येण्याचें कारण एवढेंच होतें कीं, तेथें एखादेवेळीं चहा, चिवडा वगैरे होई व तो चिवडा बाजारी असे. त्यांना बाजारी खाण्याची संवय नव्हती. नाहीं ह्मटलें ह्मणजे बायकांनां राग येई. मी जेव्हां बायकांनां जरूर वाटेल तेव्हां दूध, केळें वगैरे द्यावें, नाहींतर त्यांना आग्रह करूं नये, अशा बोलीवर आणल्या, तेव्हां पुढें सहवासानें त्यांच्याबद्दल सर्वांनां प्रेम व आदर वाटूं लागला; आणि इतक्या चांगल्या बाईंची ओळख आजपर्यंत झाली नाहीं, याबद्दल त्यांनां वाईट वाटलें. तरी सांगावयाचा मुद्दा एवढाच कीं, आपण किरकोळ मतभेद, जातिभेद, पक्षभेद सोडा, त्यांत तडजोड काढा, मनाचा मोठेपणा दाखवा व कार्याला लागा. आपण तसें केलेंत ह्मणजे आपल्या स्त्रियाही तसें वागायला तयार होतील. प्लेग सारख्या रोगानें एखादी गल्ली दूषित झाली ह्मणजे आपण ती सबंद गल्ली रिकामी करितों. त्यांत जातगोत पहात नाहीं, तसें अज्ञानाच्या योगानें सर्व राष्ट्र दूषित झालें आहे, तें आपणां सर्वांच्या एकीनें सुधारा. राष्ट्रीय सुधारणा अवघड आहे;

परावलंबी आहे; पण सामाजिक सुधारणेमध्यें परावलंबीपणा कां? तुमच्या गांवांत एक नवा मनुष्य आला ह्मणजे तो एक मनुष्य आहे, आपला बंधु आहे असें समजून त्याची शक्य तितकी काळजी घ्या. नाहींतर प्रभु मनुष्य आला चालले सगळे प्रभू त्याची तजवीज करायला. ब्राह्मण मनुष्य आला कीं, यांचा पत्ताच नाहीं. मग चालले ब्राह्मण. पुढें सोनार आला, कोणीच विचारीना. असें कां? सगळे आपले, ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें पुस तपास करा. स्त्रीशिक्षण, स्वच्छता, आरोग्य, सार्वजनिक शिक्षण, दुष्काळ, प्लेग, रेल्वेची गैरसोय अशा एक कीं दोन? अशा हजारो गोष्टी आहेत कीं, ज्या आपल्याला सहकारितेच्या जोरावर करावयास आपलें सर्व आयुष्य पुरून उरेल. तें करतां करतां सहजा सहजीं जर तुह्मांला तुमच्या ध्येयाप्रमाणें वरच्या पायऱ्यांवर लोकांनां चढवतां आलें अगर तुमचें उदाहरण पाहून लोक चढले तर चढूं द्या. पण तेवढ्या गोष्टीकरितां त्यांच्याशीं विरोध करूं नका. विरोधीभक्ती फक्त रावणालाच उपयोगी पडली. ती आपल्याला पडणार नाहीं. पुष्कळ गोष्टी काळ आपल्या आपण करील. त्याच्याकरितां आपण लोकमताशीं कायमचे वांकडे होऊन आपलें आणि त्यांचें तेवढें सुख घालवूं नका. श्री. कर्व्यांच्या आत्मचरित्रांत आपण पहा. त्यांना पुनर्विवाहामुळें कशा रीतीनें वागविण्यांत आलें. पण आतां आह्मी कोणीही स्त्रिया पुनर्विवाहित स्त्रीला शिवल्याबद्दल स्नान करीत नाहीं, त्या आमच्यांत मिसळतात. आमच्यांतील कितीतरी बायका त्यांच्याशीं

प्रेमानें वागतात. तेव्हां त्यांनीं मुद्धां मनाचा मोठेपणा दाखवायला नको कां? पण नाहीं तें होत नाहीं. अजून आमच्यांत पुष्कळ स्त्रिया त्यांना कुंकूं लावायला किंवा त्यांच्या कडून लाऊन घ्यायला कचरतात. तेव्हां अशावेळीं त्या मनाचा मोठेपणा दाखवीत नाहींत. बाकीच्यांच्या मनावर हजारों वर्षांच्या संस्कारामुळें जडलेले संस्कार जात नाहींत. पण अशा वेळीं मला वाटतें, पुनर्विवाहित स्त्रियांनींच जास्त मोठेपणा दाखविला पाहिजे. कारण, त्यांनीं जर रूढीविरुद्ध एवढें मोठें धैर्य दाखविलें तर त्यांनां एवढीशी साधी गोष्ट कां करतां येऊं नये? पण नाहीं. त्या उलट मुद्दाम दुसऱ्याची परीक्षा पहाण्याची वेळ आणतात, व एकत्र मिसळणें, बोलणें, बसणें, वगैरे जो फायदा त्यांनां मिळतो, व त्यांच्या वागणुकीनें जो आदर लोकांमध्यें उत्पन्न व्हायचा असतो, तो त्या आपल्या अशा वागणुकीनें, लोक आपल्याला दूर करतात म्हणून दाखविल्या जाणाऱ्या तिरस्कारानें घालवतात. पण असें पहा, ज्या समाजांत आज हजारों वर्षें पुनर्विवाहाची चाल आहे, त्या समाजांतमुद्धां पाटाची बायको सवाष्णींना कुंकूं लावायला, देवकाला, लग्नकार्याला चालत नाहीं. जर एखाद्या कुणब्याच्या घरांत २।३ भाऊ असले तर त्यांतला एक मुद्दाम लग्न करतो. कारण दोन भावांनीं जर पाटाच्या बायका केल्या तर ते भाऊ लग्नकार्यांत देवक बसावयाच्या उपयोगीं पडत नाहींत. म्हणून ज्या समाजांत ही रूढी नवी आहे, जेथें कुंकूं लावणें हा एक मंगल, शुभसूचक विधी समजला जातो, तेथें विनाकारण लोकांशीं दुराग्रह, तंटा,

वाद काय ह्मणून घालावा ? आणि तो सुटला कीं, अर्थात् संघट्टन वाढतें. कारण मला ठाऊक आहे कीं, पुष्कळदां आपल्या येथील एखाद्या चांगल्या समारंभाला एखादी पुनर्विवाहित बाई बोलवायची पुष्कळांची इच्छा असते. पण बायका ह्मणतात, 'नको बाई. त्यांनां एरवींच बोलावूं केव्हां तरी. कारण बाकी सर्व जमेल, पण त्यांनां कुंकूं आपण लावले नाहीं ह्मणजे राग येतो.' असो. सारांश नुसती समाज सुधारणा करावयास तयार होऊन भागत नाहीं. जर करावयाची तर लोकांच्या इच्छेकडे थोडीशी नजर देऊन मनाचा मोठेपणा दाखविण्याची थोडीशी तयारी हवी. ह्मणजे सुधारणेचें पाऊल थोडें पुढें पडतें. कारण ह्या असल्या गोष्टी काळ व परिस्थिती यांशिवाय बदलत नाहींत. आपल्याला ठाऊकच असेल कीं, कोकणामध्यें महाराच्या सावलीचें केवढें बंड आहे तें. पण मुंबईत त्याचा पत्ता तरी दिसतो कां ? खेडेगांवांत ब्राह्मण, प्रभु, शेणवी, मराठे यांच्या स्पर्शास्पर्शाला केवढें महत्व असतें ? पण मुंबईच्या चाळींत बायका राहुं लागल्या ह्मणजे नळावरच्या ओलीवर तांब्याभर पाणी घालून सोंवळें होतें, कारण तेथें चालत नाहीं. सारांश परिस्थिती माणसाला तयार करते. मोठमोठ्या अधिकाऱ्यांच्या व श्रीमंतांच्या घरांत स्वयंपाकाच्या आसपास कडकडीत सोंवळें असतें, पण बाहेरच्या अंगाला ह्मणजे पुरुषांत नव्हे साधारण लहान मुलीबाळी व तरुण स्त्रिया असतील तेथें, स्पर्शास्पर्शाकडे कानाडोळा करितात. प्रत्यक्ष झाला तरच लुगडें बदलावें लागतें. कारण काय ? त्यांच्या येथें चार गडी-

माणसें असल्यामुळें तसें केल्याशिवाय चालत नाहीं. देशांतील खेडेगांवांतून महार, कुणबी व ब्राह्मण प्रेमानें गोष्टी बोलत विड्या ओढतात. अशा एक कीं दोन ? हजारों गोष्टी आपल्याला मला दाखवितां येतील. पण मला वाटतें ह्या सर्व गोष्टी काळानें व परिस्थितीनें आपल्या आपण होतात. त्या चाऊन चिकट व ओढून बळकट करण्यांत अर्थ नाहीं. ज्याच्याशीं आपलें जेवढें पटेल तेवढ्यापुरता त्याच्याशीं सलोखा करून कार्याला लागलें पाहिजे. जर आपल्यामध्यें कांहीं विचार असेल, जर कांहीं शिक्षणाचा परिणाम आपल्यावर झाला असेल, तर उठा. हे क्षुल्लक जातिभेद, मतभेद सोडा आणि कार्याला लागा. इंग्रज प्रभुच्या शांततेच्या राज्यांत आपली धार्मिक, सामाजिक व नैतिक उन्नति करण्याची एक जूट करा. धर्मानें ह्मटलें आहे कीं, 'कौरवांच्या विरुद्ध जेव्हां कोणी येईल तेव्हां आह्मी १०५ जण आहोंत.' ते धर्मराजाच्या तोंडून निघालेलें कर्तव्य धर्मानें भरलेलें वाक्य आपण पाठ करा. आणि हिंदुस्थानच्या अज्ञानरूपी शत्रुपुढें आपण हिंदी ही एक जात आहों असें कल्पून उभे रहा. ह्मणजे सर्वांच्या प्रयत्नानें आपलें राष्ट्र शिक्षणानें अलंकृत होईल; तेथील स्त्रिया उत्तम माता होतील व तेथील प्रत्येक मनुष्य उत्तम नागरिक होईल; आणि आपलीं ऐहिक व पारमार्थिक कर्तव्यें बजावावयास तयार होईल. तेव्हां अशा तऱ्हेनें तडजोड करून वागावयाची सुबुद्धि ईश्वर माझ्या दरेक बंधु भगिनीला देवो.



# ८ प्रौढविवाह.



हल्लीं प्रौढ विवाहासंबंधानें जेथें तेथें चर्चा सुरू आहे. व सुशिक्षितांपैकीं बऱ्याच जणांनां प्रौढविवाह पाहिजे हें तत्व मान्य झालेलें आहे. तरी पण कांहीं प्रमुख शहरें सोडल्यास प्रौढविवाहासंबंधीं उदासीन असाच पुष्कळ मोठा समाज आपल्या पाहण्यांत येतो. तथापि यदृच्छेनें मुलींच्या व मुलांच्या लग्नाची वयोमर्यादा वाढतच आहे.

सुशिक्षित समाज जर प्रौढ विवाह हवे ह्मणणारा आहे तर मग तंटा कोठें उरला? असा प्रश्न साहजिकच पुढें येतो. पण प्रौढ विवाह हवे ह्मणणारांत सुद्धां अद्यापि कांहीं पंथ आहेत. त्यांचे ठोकळ प्रमाणानें तीन वर्ग करितां येतील. त्यांतील पहिला वर्ग सुशिक्षित पदवीधर अशा नव्या तरुणांचा. सगळ्या गोष्टींत सुधारणा झाली पाहिजे, असें या वर्गाला वाटतें. आपले लोक, आपला समाज वगैरे कांहीं बघावयाचें नाहीं! आतां दुसरा वर्ग ह्मणजे प्रौढ विवाह हवे ह्मणणारांचा; पण ते कशा रीतीनें झाले असतां सुखावह होईल, किती डिग्रीपर्यंत समाजाचें मन दुखवावें, त्यांत कोणकोणत्या अडचणी येतील, वगैरे वगैरे विचार करून वागणारीं माणसें. तिसरा वर्ग प्रौढ विवाह हवे ह्मणणारा खरा,

तरी पण त्यासंबंधीं स्वतःला विशेष त्रास देऊन किंवा मनाचा विशेष खंबीरपणा धरून वागणारा असे नव्हे; पण फारसें कोणी वाटेस न गेल्यास मुली वाढवील! बरें, कोणी आग्रहच केला, किंवा एकादें चांगलेंसें स्थळ आलें तर लग्न लवकरही करील. तेव्हां या वर्गासंबंधीं फारसा विचार करावयास नको.

प्रौढ विवाहाचे अभिमानी असें जे पहिले दोन वर्ग, त्या दोघांमध्यें मुलींच्या प्रौढ विवाहाच्या वयोमर्यादेसंबंधींच मतभेद आहे. पहिला वर्ग ह्मणतो, कीं, मुलांची विद्या पुरती होऊन तो आपल्या उदरनिर्वाहाच्या साधनाला लागल्यानंतर त्यानें आपण होऊन पसंत केलेल्या वधूशीं होणारा विवाह तो प्रौढ विवाह; व दुसरा वर्ग ह्मणतो, कीं, मुलाचें वय वीस बावीस वर्षांचे सुमारें असलें; व मुलीचें वय चौदा पासून पुढें असलें, ह्मणजे जीं लग्नें होतात तीं प्रौढ विवाहच; मग या वयांत जरी मुलगा शिकत असला तरी हरकत नाहीं.

मला वाटतें, आपल्या हल्लींच्या एकंदर समाज रचनेचा विचार करितां हा दुसरा वर्ग बरा दिसतो. आतां ज्यांना बाकीची परिस्थिती अनुकूल आहे, त्यांनीं उत्तमांत उत्तम अशा सुधारणा केल्यास कांहींच हरकत नाहीं, व त्या त्यांनीं अवश्य कराव्या; पण साधारण सुखवस्तु लोकांनां तसें करितां येणें शक्य नसतें. कारण, मुली वाढविणें ही कांहीं तोंडची गोष्ट नाहीं! त्यांच्या विद्याभ्यासाची व उदरनिर्वाहाची चांगली सोय आईबापांनां करता

आली पाहिजे. आपल्या इकडे दिवसेंदिवस शिक्षणाचा खर्च इतका वाढत चालला आहे कीं, साधारण लोकांनां मुलाला शिकविणें सुद्धां मुष्किल झालें आहे. तेव्हां अशावेळीं त्या बिचाऱ्यांनीं आपल्या दोन दोन तीन तीन मुलीच्या विद्याभ्यासाची सोय कशी करावी? साधारण गांवांतून मुलींच्या मराठी शाळा सुद्धां पुरत्या नीट नसतात. ज्या थोडाशा गांवीं असतात, तेथें सुद्धां त्यांनां तें शिक्षण नीट देण्याचीं साधनें शिक्षणखातें व म्युनिसिपालट्या यांनां पुरीं पाडतां येत नाहींत. तेथें मुलीच्या इंग्लिश शिक्षणाची कसली सोय होणार? इतकेंहि करून आईबापांनीं आपली मुलगी आपण काबाडकष्ट करून पुष्कळ शिकवुन तयार तयार केली, तरी तिला योग्य वर कोठें मिळावा? कारण अगदीं त्यांच्याच बरोबरीचे लोक एकदम एवढी मुलगी करण्यास तयार नसतात. बरें. जर एकादा तसा तरुण मनांतून तयार झाला, तरी त्याचें आपल्या आईबापांपुढें कांहीं चालत नाहीं. तेव्हां आतां एखादा चांगला सुशिक्षित तरूण पती मिळेपर्यंत अविवाहित रहाण्याचा जर निश्चय केला, तर तिनें आपला खर्च आईबापांच्या जिवावर तरी किती दिवस टाकावा? व स्वतंत्र उद्योग करण्याचें मनांत आणल्यास मास्तरणीच्या धंद्याशिवाय तिला उद्योग तरी काय मिळणार? आणि अशा रीतीनें जर मास्तरणींच्या नोकऱ्या सर्वच मागावयास लागल्या, तर तशा जागा तरी कोठें आहेत? इतक्याहि उपर असें बघा कीं, जर त्या कुटुंबांवर दुर्दैवानें वाईट प्रसंग येऊन घरांतील कर्ता पुरुष निवर्तला तर जवळ एक पैचीही

शिल्लक नसल्यामुळें त्या पोरांबाळांवर काय प्रसंग येईल ? व अशा वेळीं अशा कुटुंबांनां साहाय्य करणाऱ्या अशा कितीशा संस्था व उदार घरें आपल्या महाराष्ट्रांत आहेत ? याचा ज्याचा त्यांनींच विचार करावा. हल्लीं आपल्या हिंदुस्थांत प्लेग कालऱ्यासारख्या ज्या दैवी आपत्ती वरचेवर कोसळत आहेत, आणि त्यामुळें कित्येक कुटुंबांवर जीं संकटें येत आहेत, त्यांचा विचार करितां दरेक माणसानें आपल्या विपत्तीच्यावेळीं उपयोगीं पडण्याकरित. ह्मणून आपल्या जवळ कांहीं तरी व्यवस्था करून टेवली पाहिजे. व मग आपल्या मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष दिलें पाहिजे. त्यांतले-त्यांत आपली परिस्थिति पाहून जितकें शक्य असेल तितकें करण्यास चांगल्या बुद्धीनें झटणें हें दरेकाचें कर्तव्य आहे. तें होईल तितकें बजवावें, असा दुसऱ्या वर्गांतील माणसांचा बेत असतो.

प्रौढ विवाह आणि शिक्षण हें केव्हांही वाईट नाहीं; पण जसें एखादें नुकतें चालावयास शिकलेले मूल असतें व त्याच्याशीं आपण खेळत असलों ह्मजने आपण पुढें पळतों व मी अशी पळतें, असे त्याला दाखवितों; व ते पळत पळत आपल्या जवळ आलें ह्मणजे आणखी पळतों; पुनः थांबतों; असे एक दोनदां करतों, मग त्या मुलाला आपल्याला धरूं देतों, ह्मणजे त्याला 'मीं तिला पकडलें,' असा अभिमान उत्पन्न होऊन दुप्पट जोर येतो; पण असें त्याला पळावयाला लावण्यापूर्वीं तो रस्ता त्याला

पळावयाला योग्य आहेना? मध्यें कांहीं उंच सखल जागा किंवा कांटे वगैरे नाहींतना? हें आपण बघतों. तसेंच समाजाचें आहे. अद्यापि आपला समाज बाल्यावस्थेंत आहे. त्याला या लहान मुलाप्रमाणें आपण पुढें पुढें यावयाला शिकविलें पाहिजे, व त्यासाठीं आपण थोडथोड्या अंतरावर मुक्काम केला पाहिजे. व तसें करितांना बाजूची परिस्थितीरूपी वाट आधीं नीट करून मग सुधारणा अमलांत आणणें हें खऱ्या सुधारणा हितेच्छूचें काम आहे.

आतां वर जरी मुलींसंबंधीं परिस्थिती लिहिलेली आहे, तरी प्रौढ विवाहाची रूढी वाढावयास आणखी एक दुसरें साधन आहे, आणि तें अमलांत आणलें, कीं, मुली वाढवा ह्मणून सांगावेंच लागणार नाहीं, व बिचाऱ्या पालकांनां मुलींचें लहानपणीं लग्न करितात, ह्मणून शिव्याही खाव्या लागणार नाहीत! तें साधन हेंच कीं, दरेक पालकानें आपल्या मुलांच्या वयाची मर्यादा वाढवावी, व दरेक तरुणानें शक्य असेल तों पर्यंत आपलें लग्न लवकर न होऊं देण्याचा निश्चय करावा. आणि असें झालें, ह्मणजे मुलींच्या वयाची मर्यादा आपोआप वाढेल. मोठ्या मुली केल्या ह्मणजे त्यांनां त्यांची आवड, वय व उंची यांनीं योग्य असा प्रथम वर मिळण्यास किती अडचण पडते: याची माहिती मुलीच्या बापास विचारल्यास त्याची कल्पना बरोबर येईल. हल्लीं मुलगी योग्य वर मिळेपर्यंत पाहिजे तितकीं वर्षे अविवाहित ठेवण्याची

त्यांच्या मनाची तयारी नसल्यानें, व त्यांच्या प्रौढ विवाहाच्या कल्पनेप्रमाणें ह्मणजे १५।१६ वर्षांची होईपर्यंत वाढल्यानें तिला सर्व परिस्थितींनीं अनुकूल असा योग्य वर मिळत नसल्यामुळें साहजिकच बिजवर बघावा लागतो; व मग त्यांतच वाईटांत जितकें चांगलें तितकें शोधून आपलें समाधान करावें लागतें; व अशामुळें मग तीच सुधारणा हितेच्छु माणसें " परिस्थिती बदले-पर्यंत एकदम उडी न मारतां जशीं होत आलीं तशीच लग्नें करावीं झालें; " असें ह्मणूं लागतात. तेव्हां दरेक मुलाच्या बापानें आपला मुलगा वाढविण्याचा निश्चय करण्यापूर्वीं मुलींच्या बापांनां " लहानपणीं कां लग्नें करितां " ह्मणून शिव्या देण्यांत फारसें हांशील नाहीं. कारण; मीं वर ह्मटल्याप्रमाणें ज्यांनां परिस्थिती अनुकूल आहे, व विशेष प्रकारचें मनोधैर्य आहे, त्यांची गोष्ट सोडा; पण साधारण समाजाकरितां वर दर्शविल्याप्रमाणें परिस्थिती आहे, तोंपर्यंत त्यांनां स्वत: हळुहळू मार्गक्रमण करून यत्किंचित्‌ वाट पहाणें जरूर आहे.



# १ तरूण पिढी व सामाजिक सुधारणा.



सुधारणा हा शब्द हल्लीं इतका ऐकूं येतो कीं, त्याचा अर्थ करून कोणाला सांगण्याची जरूर उरली नाहीं. हायस्कुलांत जाणारीं मुलें, युनिव्हर्सिटीचे विद्यार्थी व नोकरी वगैरे पेशांतील तरूण व वयस्क आपआपल्या परीनें सुधारणेची इच्छा करितात. पूर्वीच्या विद्यार्थ्यांना विद्यार्जन, वाचन व खेळ ह्यां शिवाय बाकीच्या विषयांची विशेषशी चर्चा करण्यास विद्यार्थीदशेंत वेळही नसे व संवयही नसे, पण हायस्कूलांत वरील क्लासांत मुलें जाऊं लागलीं कीं, हळू हळू त्यांच्यामध्यें देशसेवा, राष्ट्रसेवा, समाज-सुधारणा वगैरे शब्दांची बडबड सुरू होऊं लागते व मग ते जसजसे मोठे होतात तसतशी त्यांची चर्चा वगैरे होऊन त्यांच्या विचारांची वाढ होते. पुढें कॉलेजांत त्यांचें पाऊल पडलें कीं, एक-दोन वर्षांत ते आपल्याला ह्या विषयांचें सांगोपांग ज्ञान झालें असें समजून समाज सुधारणा करणें हें तरुण पिढीचें मुख्य कर्तव्य आहे म्हणून कमरा बांधून तयार होतात व अभ्यासा शिवायचा बहुतेक वेळ जगरूपी पुस्तकावरून धडे शिकण्यांत किंवा एखाद्या आपल्याला आवडणाऱ्या विषयांची माहिती मिळविण्यांत वगैरे फारसा न घालवितां पुनर्विवाह, प्रौढविवाह, जातिनिर्बंध, स्त्रीशिक्षण, ब्रह्म-चर्य वगैरे विषयांची चर्चा करून वादविवाद करण्यांत घालवितात.

अशा सुमारास घरीं वृद्ध आईबाप सुनमुख पाहण्याच्या इच्छेनें लग्नाचा घाट घालतात. व ती गोष्ट मग ह्या तरुण वीरांना कळते. तेव्हां अर्थात् प्रथम ते देशसेवेकरितां अविवाहित राहण्याचा आपला कडकडीत निर्धार व ब्रह्मचर्याचें महत्व ह्या गोष्टी वडील माणसांनां समजविण्याचा प्रयत्न करितात. पण गृहस्थाश्रमांत आयुष्य घालविलेल्या ह्या वृद्धांनां सुनमुख बघितल्याशिवाय आपला संसार पूर्ण झाला असें वाटत नसल्यामुळें ते मुलाला गृहस्थाश्रमांत राहून देशकार्य व धर्मकार्य करण्याचा उपदेश करितात. आणि शेवटीं वडिलांच्या इच्छेकरितां मुलगा लग्न करण्यास तयार होतो. मग दोघांची तडजोड होण्याकरितां ह्मणून आईबाप शिकलेली मुलगी करण्याचा प्रयत्न करतात व साधारण थोडें फार मराठी येणारी एखादी मुलगी नववधू ह्मणून घरीं येते. ( अद्याप चांगल्या शिकलेल्या मुली फार विरळा आहेत. ) ह्यापुढें आमच्या तरुणांनां आपलें कर्तव्य बदलल्यासारखें वाटतें.

त्यांनां नववधूच्या सुखदुःखाची व शिक्षणाची जबाबदारी आजच आपल्यावर पडलीसें वाटतें. ज्या आईबापांनीं त्यांनां लहानाचें मोठें केलेलें असतें त्यांनां कांहीं दिवस सुद्धां ह्यांच्या बायकांनां प्रेमानें सांभाळतां येणार नाहीं असें वाटतें. सासूच्या जाचांतून मुलीला सांभाळणें हें आपलें कर्तव्य असें त्यांनां वाटूं लागतें. बायको आपल्या बरोबरीची झाली पाहिजे. देशहित, राष्ट्रहित, सामाजिक सुधारणा वगैरे सर्व तिनें एकदम

करावयास लागलें पाहिजे असें त्यांना वाटतें. व त्याचें शिक्षण पत्नीला देण्याची आवश्यकता सहजच उत्पन्न होतें. पण कॉलेजचा शिक्षणक्रम आणि पुढील पोटाची विवंचना पुढें आ ह्मणून उभी असल्यामुळें पत्नीला कॉलेजांत राहून शिक्षण देण्याला व काळजी घेण्याला धोपट मार्ग ह्मणजे पत्रव्यवहार असें ठरतें, व मग त्याला सुरवात होते. तरी पण अभ्यासांतून मिळणारी फुरसद प्रणयरस-प्रधान अशा नॉव्हेलस् वाचण्याकडे जाते. कारण पत्नीकडून येणाऱ्या पत्रांनां नियमित उत्तर घालण्याची महत्वाची कामगिरी त्यांच्यावर असते. अशा प्रकारें चालणारा कार्यक्रम सुटीमुळें थोडा बदलतो. कारण वेळेचा अपव्यय करणें तरुण मुलांनां मुळींच आवडत नसल्यामुळें त्यावेळाचा फायदा घेण्याचा ते विचार करतात व नववधूला शिक्षण देण्याच्या निश्चयानें मास्तरकी पेशाला काय काय साधनें हवीं त्याची ते तयारी करूं लागतात. पण गोडीगुलाबीनें शिक्षण देणें हें हल्लींच्या मनूंतील तत्व असल्यामुळें लहान लहान कादंबऱ्या, माला, नाटकें वगैरे साहित्याच्या जमवाजमवीनिशी स्वाऱ्या घराकडे फिरतात. तरुण मुलांच्या उल्लु विचारा पुढें आपण कांहीं बोलल्यास आपला बोज रहावयाचा नाहीं या समजुतीनें आईबाप वगैरे वडील माणसें तिकडे काना-डोळा करितात व ह्यांच्या मास्तरकीला सुरवात होते. मुलगी बिचारी लहान असते. तिला त्यांच्या सुधारणा कुधारणा वगैरे शद्बांचे खरे अर्थही कळत नसतात. फक्त नवरा सांगेल तें ऐकावयाचें ह्मणून ती होला हो करून देते.

ह्याचा परिणाम असा होतो कीं, धीट मुलगी असते ती नवऱ्याच्या ह्या वर्तनाचा फायदा घेऊन घरांतल्या कामाकडे आंग चुकारपणा करते व सुधारणेच्या नांवाखालीं नवीन नवीन चोजल्यांनां सुरवात होते मग एखादेवेळेस सासू बोलली ह्मणजे तें जाचाच्या सदरांत येऊन नवऱ्याच्या कानापर्यंत जातें. नवरा काय वर्षांतून केव्हां तरी येणार तेवढ्यापुरतें पुढल्यापुढं केलें ह्मणजे त्यालाही आई किरकिरी असा समज होत जातो. बरं मुलगी गरीब असली तर तिचें पाप विचारूं नका. नवरा सुधारणेच्या व शिक्षणाच्या ज्या लांब लांब गप्पा मारतो किंवा खऱ्या गोष्टी शिकवतो त्या मनाच्या प्रगल्भतेच्या अभावीं तिच्या अंतःकरणांत उतरत नाहींत. नवऱ्याला राग येईल ह्मणून कळलं नाहीं सांगावयाचे भय वाटतें. तो सांगतो त्या गोष्टी मूळ संस्कार निराळे असल्यामुळें करावयास कसेसें वाटतें. त्यामुळें घटकेंत असें तर घटकेंत तसें, अशी द्विधावृत्ति होते. इकडे मुलगेही खरी शिक्षणाची जबाबदारी व ही नसती घेतलेली जबाबदारी ह्यामुळें मनानें अस्वस्थ होतात व त्याचा परिणाम स्वाभाविकरीत्या त्यांच्या शरीरावर होतो. अशा स्थितींत एखादं वर्ष पुढें जाऊन युनिव्हर्सिटी कार्यक्रम अखेर अखेर होत येतो. एक दोनवर्षं शिक्षणाचीं शिल्लक राहतात. त्याच्या जय अपजयावर भावी आयुष्य अवलंबून असतें. इकडे पतीकडून सहज मिळत गेलेल्या स्वतंत्रतेमुळें तरुण पत्नीकडून घरीं येतांना आणावयाच्या नेकटायच्या सुताच्या, सुयांच्या व पोतींच्या ऑर्डरीचीं पत्रें येऊं लागतात व त्यांच्या

विद्यालयाविशीं स्वारी घरीं येते. आतां घरीं जरा निराळ्या तऱ्हेचा थाट झालेला असतो. १४ अगर १५ वर्षांची मुलगी आजीबाई झालेली असते. तिला पतीच्या विरहानें चैन पडेनासें झालेलें असतें व त्याकरितां एकदां लवकरसा शिक्षणक्रम आटपून नोकरी धरण्याच्या तगाद्याला सुरवात होते. सासूबाईच्या कुरकुरीला ती कंटाळते. घरांतल्या कामाच्या धबडग्याखाली शिक्षण वाढवावयाला अवसर नसतो ( जसें कांहीं सासू माझ्यानेंच काम आणते ) व ह्या सर्वांचा विचार करितां पतिराजांनांही नोकरीची अगर स्वतंत्र धंद्याचीही आवश्यकता वाटूं लागते व त्या दृष्टीनें शिक्षणक्रमाला सुरवात होते. व शेवटीं एकदां गंगेंत घोडे न्हाऊन हे विद्यार्थी-दशेतून मुक्त होतात.

बायकोलाही आपण सासूच्या जाचांतून मुक्त होणार ह्मणून आनंद वाटतो. आईबापांनां पैशांचें सार्थक झालेसें वाटतें व नोकरी बघायला अगर स्वतंत्र धंदा करायला सुरवात होते. नोकरी लागली ह्मणजे पतिराजाबरोबर साहजिक जाण्याची तयारी होते. आईबा-पांनां त्यांच्या प्रेमामुळें मुलगा मुलगी अजाप लहान आहेत, " आताच एकटीं कशीं पाठवावीं " अशी भीति वाटते. शेवटीं हे नोकरीवर गेले कीं, पत्रद्वारें अगर इतरांकडून पत्नीस पाठवि-ण्याची सूचना होते व काळमान ह्मणून अगर मुलाशीं विरोध टाळण्याकरितां तें तावडतोब अमलांत येतें. इतक्या प्रयासानें मिळविलेल्या स्वतंत्रतेचा आतां शिक्षणाच्याकामीं कितपत उपयोग

होतो ह्मणाल तर आरंभाला नव्या संसाराच्या नव्या व्यवस्थेंत कांहीं दिवस आनंदांत केव्हांच जातात. सासूबाई किंवा इतर कोणाच्या ज्या गोष्टी पाहिलेल्या असतात त्या ताबडतोब तशा करावयाची तयारी होते व वयाच्या वाढीच्या अभावीं आलेल्या ह्या पोक्तपणांत खरोखरीच्या पोक्त बायकांनीं केलेल्या गोष्टींचीं नक्कल केली ह्मणजे माकडचेष्टेसारखें होतें. त्यांना आपण एकदम मोठ्या वाटायल्या लागल्यामुळें आसपासच्या मोठ्या बायका सुद्धां त्यांनां घरीं व्यवहारज्ञानाची अगर रीतीची गोष्ट सांगावयास कांकू करितात व बरोबरीच्या बायकाशीं स्वच्छंदी वर्तन करावयास मिळाल्यामुळें मनांतली स्वाभाविक भीति व दाब नाहींसा होतो. इतक्यांत मातृपदाची प्राप्ती झाल्यामुळें शिक्षणाच्या गप्पा गुलदस्तांत राहतात. पतिराजांच्या समाज सुधारणेच्या वल्गना गतकथा होतात. व राणीसाहेबांची मर्जी संभाळणें व मुलांचें कौतुक करणें हेंच इति कर्तव्य होऊन बसतें व सुधारणांची इतिश्री सुधारक ह्मणविण्याचीं बाह्य चिन्हें ज्या कपड्यालत्त्याच्या फ्याशन्स त्यांवर सुधारणा संपूर्ण होते.

आतां ह्या सर्वांचा विचार केला ह्मणजे सकृद्दर्शनीं असें वाटेल कीं, हा सर्व परिणाम लवकर लग्नाचा आहे व एका दृष्टीनें विचार करितां तें खरेंही आहे. पण त्याला उलट आईबापांच्या दृष्टीनेंही विचार केला पाहिजे. विद्या पूर्ण झाल्यानंतर लग्न करण्याचें नवीन पिढीचें ध्येय त्यांनीं आपल्या हातांत सत्ता आल्यावर अवश्य

आमलांत आणावें व त्यांनां तें अमलांत आणायला जडही जाणार नाहीं. कारण त्यांचे विचार बनलेले असतात; पण जीं माणसें आज पहिल्या पिढींतलीं आहेत, त्यांचे विचार बनलेले आहेत, त्यांची गोष्ट निराळी आहे. हल्लींच्या महागाईच्या दिवसांत अल्प वेतनांत मुलांची विद्या करणें कसें जड जातें तें त्यांच्या स्थितींत गेल्याशिवाय कळणार नाही. आपल्यांतलि मध्यम स्थितींतले लोक ह्मणजे जे सुखवस्तु मानले जातात, त्यांच्या बहुतेकांच्या मागें पैसा घरीं पाठवावयाला ह्मणून थोडें फार गरीब कुटुंब असतें; शिवाय महागाई वाढत चालली आहे, नोकरांचें प्रमाण दिवसानुदिवस कमी होत चाललें आहे; त्यांचे पगार इतके जबर झाले आहेत कीं, ते देऊन मध्यम स्थितींतल्यानांही जिवावर येतें. तशांत घरांत लहान लहान मुलें, त्यांचीं दुखणींबाणीं, डॉक्टरांच्या वाढत्या फी, मुलांच्या शाळेंतील वस्तूंच्या वाढत्या मरजा वगैरे सर्व सांभाळून मुलाची विद्या करणें त्यांना किती जड जात असेल! आपल्या मुलाला कॉलेज खर्चाला पैसे पाठवतांना त्यांनां कसें होत असेल ह्याची कल्पना केली ह्मणजे जरा मुलगा वयांत येतांच आपल्या हाताखालीं हांक मारायला, सून आणायला त्यांनां हौस वाटत असेल ह्याची कल्पना सहजच होईल.

लहान मुलांबाळांचे कष्ट काढतांनां उद्यां सून आली ह्मणजे थोडा विसांवा मिळेल असें सासूला साहजिक वाटत असतें. कारण पैशाच्या अभावीं नोकर ठेवण्याची ऐपत नसते. शिवाय सून

आली ह्मणजे केव्हां ती असेल तेव्हां विश्रांती मिळते. पण शिवाय सून आली ह्मणून कौतुक करावयास सांपडतें. आपल्या बरोबरीच्या चार बायका आपल्या सुनांनां घेऊन हिंडतात फिरतात तसें आपल्याही करावयास मिळावें ही त्यांची इच्छा असते. तसेंच पुढें आपल्या घरची होणारी मुलगी लग्न होतांच नवऱ्याबरोबर जावयाच्यापूर्वीं जर कांहीं दिवस आपल्या घरीं राहिली तर तिला आप्त माणसांची ओळख होईल. संघट्टनामुळें थोडें फार तरी प्रेम लागेल असें त्या खुळ्या आईबापांनां वाटत असतें. आपली पुत्रवधू आपल्या घरांत हिंडली फिरली ह्मणजे गृहलक्ष्मी घरांत वापरते आहे असें वाटून त्यांनां किती आनंद आणि धन्यता वाटते !! पण मुलें ह्मणतात, तुह्मीं त्यांनां जास्त रीत काय लावणार? त्याला इतके दिवस काय करावयाचे? असं शेण लाव असं एकदां सांगितलं ह्मणजे झालं. आमक्या बाईला नवऱ्यानें नमस्कार केला ह्मणजे आपण करावयाचा हें त्यांनां आपल्या आपण कळतें. जी रीत सुनांनां पाहिजे असं तुह्मीं ह्मणतां तीच रीत त्यांच्या आया नाहींकां शिकवणार? उलट सासूपेक्षां त्या ममतेनें शिकवितील. कदाचित् हें खरें असेल, तरी पण सोनारानें कान टोंचलें ह्मणजे दुखत नाहींत. ही ह्मण खरीना! तसेंच आईच्या प्रेमाच्या जोराखालीं मुलीचे दोष संपूर्ण दिसत नाहींत. दिसले तरी गोड धाकानें ते जात नाहींत. पण त्याच मुली सासरी गेल्या ह्मणजे सासूच्या एका शद्बानें धाक बसतो.

आतां त्याला उलट असें ह्मणतात. धाकानें काय फायदा ! उलट मनावर दाब पडतो. तर मग शाळेंतल्या मास्तरांचा तरी मुलांवर धाक कां असावा ? त्या धाकानें दाब पडून मुलें किती वाळलीं आहेत ! आजपर्यंत सर्व शिक्षक लोक मुलांशीं प्रेमानें वागून आपल्यासंबंधीं मुलाच्या मनांत आदर उत्पन्न करून आपला धाक व शिस्त ठेवित आले आहेत. आतां त्यांत जसा क्वचित् एखादा वाईट मास्तर मिळतो तशीच क्वचित् वाईट सासू असेल. पण बाकीच्या शेकडा ९० सास्वा सुनाशीं प्रेमानें वागून त्यांच्या-वर आपला दरारा ठेवून काम घेतात. रीतभात शिकवतात व शेकडा ९० सुना सासूबद्दल आदर बाळगून तिच्या शिस्तींत वागावयाचा प्रयत्न करतात. आतां ह्यांत मनुष्य स्वभावाप्रमाणें कांहीं स्वभाव [ विरोध ] एकमेकींना न आवडणारा असतो. पण स्वतंत्रता आल्यावर तेवढा वचपा काढायला मिळतो किंवा एरवीं सुद्धां हळु हळू सासूच्या आवडीनावडीकडे कानाडोळा करून आपल्याला आवडणारी एखादी क्षुल्लक चाल रीत सुना पाडताच व सासूबाईही एकदां दोनदां सांगून गप्प बसतातच. असा कांहीं सर्व जन्म सासूच्या ताब्यांत जावयाचा नसतो. ३–४ वर्षांत पतिराज डॉक्टर, वकील अगर नोकर बनून लांब जातात. तसेंच २–३ वर्षांच्या अवधींत ज्या पांच सहा सुट्या मिळणार तेवढ्यांत पतिराजांनां असें शिकवून किती शिकवतां येणार ? फार तर थोडें वाचन वाढवायला सांगावं. हौशी आईबापें असलीं तर ती सुनेच्या शिक्षणाची सोय करताच; तेव्हां ती सांगतील तें

निदान ऐकायाची तरी बायकोला संवय ठेवावी. अवघ्या २–३ फार तर चार वर्षांच्या अवधींत कांहीं दिवस सासरी तर कांहीं दिवस माहेरीं जाण्यायेण्यांत जेथें वेळ जाणार तेथें सासू असे सुनेचे हाल तरी किती करील कीं, तिच्या खुशालीची जबाबदारी नवऱ्यावर पडावी? [ आतां एखादी कर्दनकाळ आई असेल तेथें गोष्ट निराळी. ] ज्यांनीं तुह्मांला येवढ्या प्रेमानें लहानाचे मोठे केलें, तीं दुसऱ्याच्या मुलीला थोडी फार तरी नाहींका जपणार?

आतां माहेरच्या सारखे लाड कदाचित् नाहीं होणार, पण दहा माणसांतला टक्या टोणप्याचा थोडासा अनुभव पुढील संसाराचा वाटाड्या ह्मणून नाही कां कामीं पडणार? वरून मुलगे विद्यार्जनाकरितां स्नेहाच्या घरीं, खाणावळींत अगर बोर्डिंगांतून राहतात, तेथें सारा दिवस प्रेमानें चौकशी करणारी आईबापें कोठें असतात? पण मुलगे उलट घरच्यापेक्षां सुद्धां सुदृढ असतात. त्यामुळें त्यांचे हाल झालेले कोठें फारसें ऐकिवांत नाहीं. तर मग लग्न केलें ह्मणून आईबापांनां दोष देण्यापेक्षां विद्यार्जनाचीं तीन चार वर्षें लग्न झालेंच नाहीं असें समजून विद्यार्थी दशेंत कां ह्मणून घालवितां येऊं नयेत?

त्यामुळें वेड्या समजूतीच्या आईबापांनां खुष केल्यासारखें होतें, आपला आभ्यास निर्विघ्न चालतो. मुलींची वृत्ती द्विधा न होतां उशिरां लग्न केल्यामुळें होणारीं वाढ लवकर लग्न होऊनही पूर्ण होते. सासूसासऱ्यांचे, नणदा-दीरांचे टक्के टोणपे खाण्याच्या

संवईनें पुढें संसारांत मिळणाऱ्या टक्या टोणप्यांनां तोंड देण्याची संवय होते. निरनिराळ्या स्वभावाच्या विचित्र समाजांत वावरतांनां मन बावरत नाहीं. आज्ञाधारकपणा अंगांत मुरल्यानें त्याचें महत्व कळतें. आणि नवऱ्याशीं वागतांनां त्यांचा उपयोग केल्यानें त्या नवऱ्यांनां प्रिय होतात. कारण आणखीं १०० वर्षें जरी समान हक्काच्या तत्वाची ओरड केली तरी पण बायकोनें थोडें तरी आपल्या आज्ञेंत वागावें, दरेक गोष्टींत आपलें मत घेऊन मग ती स्वतंत्रपणें करावी, अशी इच्छा असण्याचा पुरुषी स्वभाव आजच्च कांहीं खास बदलत नाहीं. आणि वयाच्या वाढीमुळें सासूच्या व आईच्या शिक्षणामुळें मनाला थोडी विचार करावयाची संवय लागून उल्लू स्वभावाला थोडा आळा मिळतो व नवीन गोष्टी उचलतांनां अगदीं अनुकरणच केवळ होत नाहीं.

विद्या होऊन स्वतंत्रपणीं राहिल्यावर बायकोला शिक्षण द्यावयास कोणाचीच हरकत नसते. आपलेंही मन स्वस्थ असतें. बायको मोठी असल्यामुळें शिकविलेलें, सांगितलेलें मनावर लवकर ठसतें. घरांतील कामाची जबाबदारी एकटीवरच असल्यामुळें आळम टाळम होऊन आळस वाढत नाहीं. मुलांत व आईबापांत सुद्धां मनें शुद्ध राहतात. संतती बरीच सुदृढ होण्याचा संभव असतो. तर मग थोडक्याकरितां आईबापांनां खूप ठेवून साधतां येणारे प्रौढविवाह, ब्रह्मचर्य, विद्यार्जन, देशसेवेचें ज्ञान, वगैरे तरुणांनीं कां करूं नये ? व आपल्या पत्नीनां अल्पवयांत व वडि-

लांची अवज्ञा करावयाची नाटकी तऱ्हा स्वीकारण्याची नकळत तरी फूस देण्याला अप्रत्यक्ष तरी आपण कां कारण व्हावें ? कामासुपणानें होणारी शरारीची वाढ कां खुंटवावी हें मला कळत नाहीं. बरें हें सर्व पतकरून तरी ते आपल्या इच्छेप्रमाणें बायकोला शिक्षण देऊं शकतात कां ? आजपर्यंत बायकोची मास्तरकी करणाऱ्या किती तरुणांनीं किती देशसेवा व समाजसेवा केली आहे ! तरुणपणीं त्यांच्या असणाऱ्या भराऱ्याप्रमाणें प्रत्यक्ष किती कृती त्यांच्या हातून झाल्या आहेत. ह्याचा जर ते आपल्या मनाशीं पडताळा पाहतील तर त्यांनां माझें ह्मणणें पटेल. आतां ह्यावरून मीं मात्र असें ह्मणत नाहीं कीं, सर्वांनीं मुलींचीं लग्नें लवकर करावीं, ज्यांच्या मनाची तयारी आहे त्यांनीं तीं खुशाल १८ व्या वर्षी करावी; पण हे चालू पिढीनें करावयाचें काम आहे. पण आज जीं आईबापें खुळया विचारांची आहेत, त्यांच्याकरितां मुलांनां एवढें नुकसान सोसून त्यांच्या मर्जीप्रमाणें राहतां येऊं नये कां ? त्यांच्या ऋणाची अल्पशी फेड एवढ्याशा साध्या गोष्टीनें करावयाची सोडून आमचे तरूण असें उलट्या मार्गांनीं जात आहेत कीं, ते जें कांहीं मिळवावयाची इच्छा करतात तें तर मिळत नाहींच. पण जवळ असतें तेंही घालवतात व मग ' हाय गेलें हुय गेलें, धुपाटणें हातीं आलें ' अशी त्यांची स्थिती होते. तरी सर्व बंधुभगिनींनीं न रागावतां ह्या गोष्टीचा विचार करावा एवढी विनंति करून हा लेख संपविते.

## १० सद्यःस्थितींत तरूण पिढीचें निरीक्षण.



सध्यां मोठा चमत्कारिक काळ आलेला आहे, सर्व जगाची उलाढाल चालली आहे. सर्व देशांमध्यें असंतोष माजून राहिला आहे. सर्व देशांतील लोक आपापल्या समजुतीप्रमाणें आपलें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं अगर कायम राखण्यासाठीं निरनिराळ्या तऱ्हेची चळवळ करीत आहेत. हें त्यांचें करणें चांगलें कीं वाईट हें ठरविणें सुद्धां मुष्किलीचें झालें आहे. मारहाण, लढाया वगैरे गोष्टी पाहिल्या ह्मणजे कोणाही शांतताप्रिय माणसाला त्रासच वाटेल. चांगल्या हेतुनें जरी एखाद्या गोष्टीची सुरुवात झाली तरी पण मनुष्य ईरेला पेटला ह्मणजे त्याचा परिणाम अतिरेकावर जातो. त्यावेळेस मनुष्याची सारासार विचारशक्ती थोडीबहुत लोप पावते. आणि ह्याचा परिणामही दोन्ही पक्षांनां त्रासदायक होतो. जगांत चाललेल्या ह्या धुमाकुळांतून हिंदुस्थान तरी कसा अलिप्त राहणार? पांच वर्षें चाललेल्या धुमश्चक्रींनें मनुष्यहानी थोडी झाली ह्मणूनच कीं काय राशियामध्यें बोल्शेविझम्, चीन व ऑस्ट्रियामध्यें अंतस्थ दंगे वगैरे रूपानें मनुष्यसंहार सुरू आहे. पण दुबळ्या पांगळ्या हिंदुस्थानांत तसलें कांहीं करण्याची ताकद नसल्यामुळें दैवानें प्लेग, दुष्काळ वगैरे दैवी आपत्ती कायमच्या येऊन वस्ती कमी करण्याचें श्रेय घेत आहेत. हिंदुस्थानचें मुळचें

वातावरण जरी तेजस्वी असलें तरी तें तेज सात्वीक आणि आत्मीक होतें. एकाकाळीं जरी हिंदुस्थानांत भौतिक शास्त्राची पुष्कळ वाढ झाली असली तरी धार्मिक शृंखलेनें तें इतकें जखडून गेलेलें होतें कीं, आपल्या स्वतःच्या सुखसोई, आपली चैन, आणि तें पुरें पाडण्याकरतां लागणारा मुबलक पैसा हेंच जीवनाचें सार त्यांनां वाटत नसल्यामुळें ईश्वरविषयक सात्विक विचार, त्याला अनुसरून असणारी सत्वस्थ रहाणी हेंच हिंदुलोकांचें ब्रीद मानलें जात असे. आपलीं जुनीं पुराणें पाहिलीं, त्यांतील थोर ऋषी व पराक्रमी राजे, यांची चरित्रें वाचलीं ह्मणजे आपल्याला असें दिसून येतें कीं, त्यांनीं आपल्या शक्तींचा उपयोग फारच क्वचित् प्रसंगीं अगदीं निरूपाय ह्मणून केला होता. आणि ज्या ज्या वेळेस अशा तऱ्हेनें त्यांनां आपल्या शक्तींचा उपयोग करावा लागत असे त्या त्या वेळेस सर्व देवतांनां, प्रजाजनांनां व बांधवांना संतुष्ट ठेवण्याकरितां यज्ञ समारंभासारखे समारंभ करून ईश्वराचें, अन्नदान करून गरीबांचें आणि प्रेमळतेनें वागून आपल्या बरोबरीच्या बांधवाचें ह्मणजे राजेलोकांचें आणि विद्वान अशा ब्राह्मणांचें ते प्रेम संपादन करीत असत. त्यावरून हाच अर्थ निघतो कीं, निरुपाय ह्मणून जेव्हां त्यांनां दुष्टांचा संहार करणें भाग पडत असे, जेव्हां त्यांना तेजस्विता दाखवावी लागत असे, तेव्हां त्यांना तें अगदीं जिवावर येत असे. आणि त्याच्या क्षालनार्थच असे उपाय योजित असत. यावरून हें नक्की ठरतें कीं, हिंदुस्थानच्या लोकांत जरी तेजस्विता असली तरी त्यांचें शील, नीतिमत्ता

आणि सद्सद्विवेक बुद्धीहीं अतिशय मोठ्या प्रमाणांत होती आणि त्यामुळेंच तें [ हिंदुस्थान ] वरच्या दर्जावर चढलें होतें. काल-वशात् जेव्हां आमच्यांतील ह्या गुणांचा ऱ्हास होत गेला तेव्हां हळू हळू आह्मी खाली जात जात पारतंत्र्याच्या शृंखलेंत अडकलों. पण दैवयोगानें चांगल्या राज्यकर्त्यांच्या हातीं आमचा देश पड-ल्यामुळें पुनः आह्माला शुद्धीवर यावयाला अवसर मिळाला. ईश्वर आणि मनुष्य ह्या दोघांचाही नियम एकच आहे, कीं एखादा मनुष्य कांहीं देण्याला योग्य झाला ह्मणजे त्याला काय तें द्यावयाचें. आतां ईश्वरापेक्षां माणसें तीं माणसेंच असल्यामुळें त्यांच्यांत थोडीशी स्वार्थलोलुपता ही असणारच. पण त्याकरतां त्यांच्यावर दांत ओठ खाण्यांत फारसा अर्थ नाहीं. जसें आपलें एखादें अजागळ मूल आहे आणि तें घेऊन आपण एखाद्याच्या येथें पाहुणे ह्मणून गेलों व तेथें गेल्यावर त्यानें जर कांहीं अजागळपणा केला तर वास्तवीक पाहुण्याचें मूल ह्मणून त्या घरच्या माणसांनीं हसूं नये. पण मनुष्यस्वभावाप्रमाणें हंसायला हें येणारच. आतां अर्थात् आपलेंच मूल जर अजागळ, तर राग येऊन काय उपयोग? पण हाही मनुष्यस्वभावच आहे कीं, राग हा यावयाचाच. तेव्हां खरा उपाय ह्मणजे आपलें मूल शहाणें करायला आपण झटणें हाच होय. हीच स्थिति हल्लीं राष्ट्राची झाली आहे. हल्लीं हिंदु-स्थानामध्यें चोहोंकडे असंतोष पसरला आहे. त्याचीं कारणें शोधून त्याच्यावर आपल्या मताप्रमाणें उपाय करण्यांत राष्ट्रांतील पुढारी मंडळी गुंतली आहे. ते रोज नवे नवे उपाय आपल्या बुद्धीप्रमाणें

जनतेपुढें मांडीत आहेत. हें काळाला धरूनच आहे. पाहूं गेलें असतां प्रत्येक ठिकाणीं काळागोरा हा भेद दृष्टोत्पत्तीस येतो. पण ही जाणीव आह्मांला इतक्या उशीरां झाली आहे कीं, ती स्थिती रागाच्या एका झटक्याबरोबर दुरुस्त होणें शक्य नाहीं. ज्यावेळेस सुरवातीला ही मंडळी आमच्याशीं सौजन्यानें आणि प्रेमानें वागत होतीं त्यावेळेस आह्मीं त्यांना खुशाल डोक्यावर चढूं दिलें. आतां कित्येक वर्षांच्या संवयीनें ही वर चढलेली मंडळी एका क्षणांत खालीं कशी येणार ? आपल्या बंगल्यांत किंवा आपल्या माडीवरच्या दिवाणखान्यांत बसणारा श्रीमंत खालीं केव्हां येतो ? जेव्हां समोरून येणारा पाहुणा आपल्या तोलाचा किंवा आपल्याहून कांकणभर अधिक तोलाचा आहे असें त्याला वाटतें तेव्हां. ती योग्यता १।२ व्याख्यानें ऐकून, १०।५ वर्तमानपत्रें वाचून, थोड्याशा स्वराज्य–होमरूलच्या गप्पा मारून किंवा पुढाऱ्यांची दर्शनें घेऊन येत नसते. हल्लीं आमच्यांतील तरूण पिढींत एक प्रकारचा नवा उत्साह येत आहे. पण त्यांच्या पाठीमागें असणारी वडील मंडळी त्याकडे फारसें लक्ष देत नाहीं. इतकेंच नव्हे तर जी थोडीशीं वडील मंडळी अशा उद्योगांत पडलीं आहेत त्यांनीच कांहीं हातांच्या बोटांवर मोजतां येण्याजोगीं वगळल्यास बाकीच्या माणसांनीं आपल्या मुलांच्या शिक्षणासंबंधानें, त्यांच्या आयुष्यक्रमासंबंधानें कितीसा विचार केलेला आहे ? ह्या ठिकाणीं आमच्या राज्यकर्त्यांचे गुण किंवा अवगुण पहाण्याचें काम मी करणार नसून आमच्या तरुण पिढीचें सद्यस्थितींतील निरीक्षण

थोडेसें करावें असा माझा विचार आहे. दुसऱ्याला नांवें ठेवण्या-पूर्वीं, दुसऱ्याला वाईट ह्मणण्यापूर्वीं आपल्या स्वतःसंबंधानें प्रत्येक माणसानें न्यायानें आणि सदसद्विवेक बुद्धीनें विचार केला पाहिजे. सध्या व्यवहारांत आपण असें ह्मटलें तर चालेल कीं, दुसऱ्यांतही दोष आहेत, मग आमच्यांत असले तर काय हरकत आहे? पण जेव्हां कसोटीचा प्रश्न असतो तेव्हां कसोटीला चढणाऱ्या माणसानें निर्दोषच असलें पाहिजे. ह्या दृष्टीनें पाहिल्यास आमचे तरूण अजून कसोटीला लावण्यायोग्य झालेले नाहींत. आह्मीं आईबाप आमच्या मुलांच्या शारीरिक व मानसिक शिक्षणाकडे जितकें लक्ष द्यायला पाहिजे तितकें देत नाहीं. आणि आमची विद्वान तरूण पिढीसुद्धां थोडेसें र ट फ करतां आलें कीं, वडिलांची इच्छा आणि आज्ञा यांची त्यांना किंमत वाटेनाशी होते त्यांनां जर आई चार गोष्टी सांगू लागली तर तीं उलट तिलाच दोन गोष्टी सांगून गप्प बसायला लावतील. तरुणांच्या अंगांत असणारें आत्मीक बळ, सात्विक तेज, आरोग्यकारक शरीरसंपत्ती ह्याचा कुठे मागमूसही दिसत नाहीं. ज्यांची बरोबरी करावयाला आपण तयार झालों आहों त्यांच्यातील जे चांगले गूण त्यांचा सांठाही आमच्या लोकांत क्वचित् दृष्टीला पडतो. आह्माला स्वतःला आप-लेपणाची चाड अतिशय कमी आहे. आमच्यांतील अंतःस्थ भांडणें मुळींच सुटत नाहींत. कोट्यावधी वर्षें चालत आलेलें जातीभेदाचें खूळ उकरून काढून आमच्यांतील मंडळी आपसांतच भांडत आहेत. कोणी कोणाचें नुकसान केलें या संबंधाच्या झाल्या-

गेल्या खऱ्याखोट्या गोष्टी उकरून काढून बायकांसारखीं नसतीं भांडणें उगाळीत बसलीं आहेत. हिंदू धर्मानें सगळ्यांनां ओरडून सांगितलेला मुख्य शद्ब ' तत्वमसि ' हा विसरून आमचें नुकसान अमक्यानें केलें ह्मणून बायकी रडगाणें गाऊन द्वेष, असंतोषवृत्ती आणि प्रेमाचा नायनाट करावयाला कारणीभूत होत आहेत. ज्या तरुणांच्या अंगांत तासभर उन्हांत रहाण्याची ताकद नाहीं, ज्यांना वेळ पडल्यास जेवणाला १० चे १२ सोसत नाहींत, रोज कसलीं तरी सायरपें अन् टॉनिकें घेतल्याशिवाय ज्यांचें भागत नाहीं, मस्तकशांतीकरतां ऐपत असणाऱ्यांनां आणि नसणाऱ्यांनां जेथें रोज नानातऱ्हेचीं तैलें लागतात, जेथें खरी स्वच्छता, खरी टापटीप यांचा अभाव, अशा तरुणांनीं एकदम दुसऱ्याची बरोबरी करायला जाणें, हें आकाशीचा चंद्र हातांत येण्याची अपेक्षा करणें यासारखें हास्यास्पद नाहींकां? मनुष्यानें उच्च ध्येय आणि उच्च आकांक्षा धरूं नये असें नाहीं. पण त्या धरायला आपलें वर्तन व कृती त्याला साजेशीं ठेविलीं पाहिजेत. स्वराज्य मिळवणाऱ्या शिवाजीचे उन्हातान्हांतून हिंडणारे, रानावनांतून भटकणारे, पोटाची व थंडीची पर्वा न करणारे, शूर मावळे कोणीकडे; अटकेला झेंडा लावणाऱ्या पेशव्यांचे रात्रो भरारीसारखे लढवय्ये शूर कोणीकडे; फुटाण्यांवर दिवस काढीत रहाणारीं माणसें कोणीकडे; निःपक्षपाती न्याय देणारे तेजस्वी न्यायाधीश कोणीकडे; स्वार्थावर पाणी सोडून, बऱ्या वाईटाकडे कानाडोळा करून सत्वाकारतां झगडणारे वीर कोणीकडे; आणि क्षणभर ऊन लागतांच जीव

कासावीस होणारे; लहानमोठे, वडील धाकटे, याचा भेदाभेद न समजतां वागणारे, शरीर संपत्तीची किंमत न समजणारे, आमचे हल्लींचे तरुण वीर कोणीकडे? मनुष्याला जितकें उच्च दर्जाचें व्हावयाचें असेल, जितकें उच्च काम करावयाचें असेल, तितकें उच्च शील त्यानें स्वतः मिळविलें पाहिजे. मनुष्याची नीतिमत्ता मनुष्यानें नेहमीं घांसून पुसून तयार ठेवावी लागते. मनुष्याच्या स्वभावाबद्दल किंवा आवडी नावडीबद्दल दुसऱ्याला दोष देतां येतील पण त्याच्या शीलासंबंधानें त्याच्या शत्रूला सुद्धां ब्र काढतां येणार नाहीं असें तें पाहिजे. तरुणांनों, तुह्मांला जर राष्ट्रीय स्वातंत्र्य पाहिजे असेल, स्वराज्य मिळावयाचें असेल तर तुह्मी राज्यकर्त्यांनां आपण त्यांच्या तोडीचे नव्हे कांकणभर जास्त योग्यतेचे आहों असें दाखवा. त्यांच्या लोकांच्या अंगांत असणारा करारीपणा, स्वाभिमान, उद्यमशीलता, नियमितपणा, आपलेपणा हे गूण आपल्या अंगांत शक्य तितके आणण्याचा प्रयत्न करा आणि शिवाय हिंदु समाजांतील सात्विकता आणि आत्मतेज तुह्मी मिळवा. तुमच्या परमपूज्य ऋषी मुनीसारखे तुह्मी तेजस्वी ब्राह्मण बना. ब्राह्मणांनीं आह्माला मागें टाकलें, ब्राह्मणांनीं आह्मांला बुडवलें हा महामंत्र सोडा. हल्लीं ब्राह्मणांनां सुद्धां आपलें ब्राह्मणत्व संभाळणें जड होत चाललें आहे. अशावेळीं त्यांच्यामध्यें अनुवंशिक संस्कारानें जे थोडेसे संस्कार शिल्लक राहिलेले आहेत ते काढून टाकून तुह्मी आमच्यांत येऊन मिसळा असें त्यांना सांगण्यापेक्षां किंवा त्यांचा हेवादावा करण्यापेक्षां तुह्मीं स्वतः

ब्राह्मण होण्याचा प्रयत्न करा. तुह्मीं आपलया शीलानें, आपल्या सत्वस्थ रहाणीनें, कामक्रोधादि षड्रिपूंच्या दमनानें ब्रह्मपद मिळवून ब्राह्मण बना. तें मिळवावयाला कोणालाही आड येतां येणार नाहीं. मनुष्यप्राण्याची व्यक्तीपुरती उन्नति प्रत्येकाच्या हातांत आहे. ती करण्याकरतां कोणालाही कोणांवर ही अवलंबून रहावयाला नको. तेव्हां हे खाजगी घरगुती तंटे सोडून देऊन, दुसऱ्याला शिव्या गाळी देण्याचें बंद करून तुह्मी स्वत:ची उन्नती करावयाच्या मार्गाला लागा. यांत तुह्मांला कोणाशींही भांडणेची जरूर नाहीं. मनुष्याच्या उन्नतीसाठीं त्याला शिक्षणाची अत्यंतिक जरूरी आहे. तरी चांगलें शिक्षण मिळेपर्यंत आहे तें शिक्षण घालवून देऊन आपल्या आयुष्यांतील बहुमोल वेळ जगाच्या वातावरणांतील नसत्या उठाठेवी करण्यांत घालवणें हें विद्यार्थ्यांनां तरी योग्य नाहीं. तुमचे पालक, तुमचे पुढारी काय करताहेत तें करूं द्या. पण तुह्मीं स्वत: पूर्ण विचार केल्याशिवाय या फंदांत पडूं नका. तुमचें हें वय अध्ययन करायेंचें आहे. ह्या वयांत प्रथम तुह्मीं अध्ययन करून मग देशाचें निरीक्षण करा. आपल्या देशाच्या आणि इतर देशांच्या परिस्थितींचा नीट अभ्यास करा. राज्यकर्त्यांत आणि तुमच्यांत कोणकोणच्या गोष्टींत अंतर आहे तें शोधा. शरीरसामर्थ्य वाढवा. सात्वीक विचार, सत्वस्थ रहाणी, आणि उत्कृष्ट नीतिमत्ता आपल्यामध्यें कसोशीनें आणण्याचा प्रयत्न करा. नव्हे आणा. तुमच्या देशाला कशाकशाची अपेक्षा आहे, त्यांतील तुह्मांला काय काय करतां येण्याजोगें आहे याचा

नीट विचार करून तुह्मांला काय करतां येईल तें ठरवा. आणि मग उद्योगाला लागा. अशा पूर्ण तयारीनें तुह्मीं उद्योगाला लागल्यास तुमचें अंतिम साध्य तुह्मांला तेव्हांच मिळेल. पण हल्लीं परिस्थिती अगदीं उलटी आहे. दुसऱ्याचे दोष पुष्कळ असतील. पण तुह्मांला तुमचे दोष मुळींच दिसत नाहींत. तुह्मी रोज नव्या नव्या शेंकडों संस्था काढतां पण आहेत त्यांना चिरस्थायित्व आणण्याचा प्रयत्न होत नाहीं. हल्लींची तरूणपिढी दिसण्यांत काडी पहिलवान, वागण्यांत बेशिस्त, काटकपणाच्या नांवानें पूज्य, व्यवहारज्ञानासंबंधानें जवळ जवळ तीच दशा, बोलण्यांत शूर नियमितपणाचा अभाव असलेली, सोशिकपणाच्या नांवानें आंवकथाएवढें, चार बरोबरीच्या मंडळींनीं एका ठिकाणीं बसावें, चार गप्पा झोंकाव्या, एक दोन पुढाऱ्यांनां चांगलें, एक दोघांना वाईट ह्मणावें. वडिलांनां कळत नाहीं ह्मणून सांगावें आणि मन मानेल तसें वागावें. अशानें राष्ट्रोद्धार होत नसतो, स्वराज्य मिळत नसतें. टांकीचे घांव खाल्ल्याशिवाय दगडाला देवकळा येत नसते. सुखशय्येवर लोळून, कढत कढत चहा पीत पीत, हाटेलच्या उसळी खात खात स्वराज्य लाभत नाहीं. आपण दुसऱ्याला कांहीं दिले तर देव आपल्याला देतो. प्रेमाचा प्रतिध्वनी बहुधा प्रेममयच उमटतो. आपण दुसऱ्याशीं योग्य स्वाभिमान राखून आपलेपणानें वागल्यास पुष्कळशीं माणसें तुमच्याशीं उलट तशीं वागतील. पण हल्लींच्या तरुणांच्या हे लक्षांत येत नाहीं, स्वतः डोळे मिटून चालून दुसऱ्याच्या मागे जाणे केव्हांही धोक्याचे आहे. जर

आपल्या मनाला खरोखरीची तळमळ असेल तर आपण आधीं आपलेपणा ओळखायला शिका. अधिकाराच्या वजनानें ह्मणा अगर अंगवळणीं पडलेल्या संवयीनें ह्मणा परकीयांनां तुह्मीं जितकी सहानुभूति दाखवतां इतकी तरी स्वकीयांसंबंधानें बाळगायला शिका. परक्याच्या डोळ्यांतलीं कुसळें काढीत बसण्यापेक्षां आधीं आपल्या डोळ्यांतील मुसळांकडे लक्ष गेलें पाहिजे. आपण आपल्या बांधवांसाठीं प्रथम स्वार्थत्याग करायला शिका. मग दुसऱ्याच्या स्वार्थाविरुद्ध गप्पा मारणें चांगलें. प्रत्येक तरुणानें उत्कृष्ट शरीरसंपत्ती, उत्तमशील, प्रथम मिळवून मग पडेल त्या कामाला तयार असण्याजोगा मनाचा मोठेपणा दाखवला पाहिजे. आपल्या माणसांचीं सुखदुःखें सोई गैरसोयी बघण्याची संवय आधीं आपल्याला लावली पाहिजे. मनुष्याला स्वतःचें असें कांहीं मत, स्वतःचें असें कांहीं तत्व, स्वतःचा असा कांहीं विचार लागत असतो. स्वतःच्या अंगात कर्तबगारी लागते. दुसऱ्याच्या संबंधानें चांगलें वाईट ह्मणण्याजोगा अधिकार आपल्या अंगांत आणावा लागतो. उगीच दुसरीं हुरळलीं ह्मणून आपण हुरळून उपयोग नाहीं. जगांतील प्रत्येक व्यक्ती वाईट आहे असें धरून चालण्यापेक्षां प्रत्येकामध्यें थोडाफार चांगुलपणा असतो असेंच धरणें श्रेयस्कर आहे. प्रत्येकाकडून आपल्याला जें कांहीं मिळवतां येण्याजोगें असेल तें आणण्याला शिकलें पाहिजे. दुसऱ्याकडे दोषैक दृष्टीनें पहाण्याची संवय सोडून समतेनें बघावयाची संवय लावली पाहिजे लोकांच्या डोळ्यांनीं पहावयाची ताकद आपल्या अंगांत आली पाहिजे. लोक

ज्या रस्त्यानें जाताहेत त्याच रस्त्यानें मी जाईन असें ठरवायचें सोडून मीं माझ्या अकलेनें चालेन अशी हिंमत दरेक तरुणांच्या अंगांत हवी. ज्या तरुणाला खरा देशभक्त व्हायचें असेल, ज्याला खरें स्वराज्य मिळवायचें असेल तो तरुण ईश्वरभक्त, आरोग्यसंपन्न, तेजःपुंज, विद्वान, करारी, विचारी आणि व्यवहारचतुर हवा. तरी विद्यार्थ्यांनो, व तरुणांनो, आपलें विद्यार्जन पुरतें झाल्यानंतर मग आपल्याला जो मार्ग दिसेल त्या मार्गांत पडलांत तरी ईश्वरभक्ती व आपलें शील केव्हांही विसरूं नका. ह्मणजे तुह्माला तुमच्या इच्छित कार्यांत नेहमीं यश येईल. तरी भांडत बसण्यापूर्वीं ही सर्व योग्यता आपण आपल्या अंगांत आणण्याचा प्रयत्न करा. आपलेपणा कायम ठेऊन ईश्वराला साहाय्याला हाक मारा ह्मणजे तो परमात्मा तुह्मांला यश देईल.

